॥ श्री ॥

# विदुरनीति

व

## नारद नीति, यक्ष प्रश्न.

हें पुस्तक

पुरंदरे आणि कंपनी

यांनीं

मुंबईंत

" कर्नाटक " छापखान्यांत छापविलें.

आवृत्ति तिसरी.

सन १८९९ शके १८२०

कैंमत ६ आणे.

# विदुरनीति प्रारं

## अध्याय पहिला.

कोणी एके समयीं संजय धृतराष्ट्र राजाजवळ येऊन कौरवांची निंदा करून बोलला कीं, मी उद्यां राजसभेस येऊन भीष्मद्रोणादिक चार शिष्टांसमक्ष पांडवांचा निरोप सांगणार आहे· ...ग काय घडेल तें घडो. असें वचन बोलून तो आपले घ ...ला असतां, परम शहाणा, धार्मिक, निस्पृह, आणि ...ाचे बोलण्यानें ऐकणारांचें समाधानच व्हावें असा जो वि ...दुरास बोलावून आणून राजानें तें सर्व वर्तमान त्यास ...ांगितलें, आणि ह्मणाला—विदुरा! उद्यां संजय सभे ...त पांडवांकडील निरोप सांगणार आहे. तो जें ...षण ... ...ल तें आमच्या निंदेचेंच करील यांत संशय ...ा त्यापासून काय अनर्थ होईल तोही कळत ...व तो येऊन गेल्यापासून माझें मन चिंता... निद्रा येत नाहीं, आणि गात्रें विकल होतात; तुला जें बरें दिसेल, आणि जेणेंकरून माझा ...ोईल, असें कांहीं मला सांग. आमच्या वंशांत ...क सुज्ञ असा दुसरा कोणी नाहीं. असें धृतराष्ट्राचें विदुर त्यास बोलला, संजय परम धार्मिक आहे. तो बहुतकरून अन्यथा बोलणार

नाहं।. मून कांहीं अपराध घडला नाहींना?
निद्र। । ह्मणतां. तर निद्रा ोधांस लागत नाहीं.
१ बळ साह्य नसतां जो ळवंताशीं वैर करितो
त्यास. २ चें द्रव्य हरण जाहलें आहे त्यास. ३ जो
कामाचे स्वाधं।., झाला आहे त्यास ाणि ४ चोरास. यां-
तून एखादा दोष तुह्मांपासून घडला हींना? शहाणा जो
आहे त्यापासून हे दोष घडत नाहींत; तर शहाणा कोण
आणि मूर्ख कोण यांचीं लक्षणें सांगतो.

जो चांगलीं कर्मे करितो; वाईट टाकि नास्तिकपणे
धरीत नाहीं; शास्त्रावर विश्वास टेवितो; क्रो , हर्ष, गर्व
लाज, ताठा आणि मानीपणा हे सोडितो; ज ची गुह्य गो
कोणासही समजत नाहीं; जें करणार तें ोस गल्या
लोकांस समजतें; शीत, उष्ण, भय, प्रीति, मा ारी, गरि
यांपासून जो आपल्या कार्यास विघ्न होऊं दे नाहीं;
उचित कर्मे करून व हळू हळू येथील विषयभ. ोडून
पलें चित्त मोक्षमार्गी लावितो; अ ाली य
ा करितो; शक्तिप्रमाणें एखाद्या कामास ह
कोणाचा अवमान करीन नाहीं; सांगितलेली
समजतो; जेथें भ्रांति पडेल तेथें समाधान क
कंटाळत नाहीं; सार वस्तूची इच्छा करितो; प्रा
दुसऱ्याचे गोष्टींत मन घालीन नाहीं; आपणा
णाऱ्या वस्तूंची इच्छा करीत नाहीं; गेल्या
करीत नाहीं; मोठ्या संकटांतही ज्याची बुद्धि

जो पक्का विचार करून कामास हात घालितो; आरंभिलेलें काम शेवटास नेतो; रिकामा काळ जाऊं देत नाहीं; मन स्वाधीन ठेवितो; थोरांचीं कर्मे पाहून संतोष मानितो; हित सांगितलेलें ऐकतो; ज्यास आपले स्तुतीनें आनंद होत नाहीं; अपमानानें खेद होत नाहीं; जो गंगेच्या डोहासारिखें चित्त स्थिर ठेवितो; सर्व वस्तु नाशवंत असें जाणतो; सर्व कर्मांची योजना जाणतो; प्रयत्न करूं जाणतो; भाषण करितांना संशययुक्त होऊन अडखळत नाहीं; बोलण्यांत अनेक रस आणावयास जाणतो; तार्किक जाणतो; ज्यास समयीं सूच तें; जो गोष्टींचें सारांश लवकर बोलायास जाणतो; ज्या ा बोलण्यास आणि शास्त्रास पडतें; जो थोरांची मर्यादा उ ंघीत नाहीं; पुष्कळ द्रव्य आहे, विद्या येत आहे र ऐश्वर्य अ हे, ह्मणून उद्धट होत नाहीं; अशा पुरुषाचे- पयीं शहा पण नित्य राहतें असें जाणावें. • • • •

जो क ा पढला नाहीं, ज्यास अहंकार फार, व जो व निं द्रव्य इच्छितो, तो मूर्ख जाणावा. जो आ- द्रव्य उधळितो; दुसऱ्याचें घ्यावयास इच्छितो; त्रिम करितो; ज्याची इच्छा करूं नये तें चें तें इच्छीत नाहीं; ज्याची संगत करूं मित्राचा स्नेह तोडितो; आपण केलेलें फिरतो; दुसऱ्याची कोणतीही गोष्ट हीं; लवकर होणार त्या कामास उ- वडिलांचें श्राद्ध व देवपूजा करीत

नाहीं; काणि जिवलग मित्र करण्याविषयीं क
यांग्य दिसत नाहीं; तो मूर्ख यांत भ्रांति नाहीं कोणतेंही
विल्याधांचून जातो; पुसल्यावांचून बोलतो; जो बोला-
विश्वास ठेवितो; ज्याचें चित्त सदा स्थिर नाहीं; नये तेथें
दुसऱ्याला ठेवितो तोच आपण आचरितो; नि जो दोष
करितो; आपलें सामर्थ्य जाणत नाहीं; स्वधर्म ष्फळ क्रोध
नाहीं; मिळवावयाची नव्हे ती वस्तु कांहीं उद्यो यास समजत
इच्छितो; जेथून लाभ व्हावयाचा नाहीं तो न करून
इच्छितो; कृपणाचा आश्रय करितो; तो पूर्ण मूर्थून ला:
आपली संपत्ति, वस्त्रें व भूषणें आपण एकटाच वें ह्मणावा
आपले आश्रितांविषयीं जो परम कृपण असतो; भोगितो
पाप करून जें द्रव्यादिक मिळवितो, त्याचा उप. आणि
घेतात पण हा पापास मात्र अधिकारी होतो; पोग
मनुष्य त्याहून दुसरा मूर्ख नाहीं. असा

एका बुद्धीनें करणें व न करणें या दोहोंचा
रावा. १ सलूख, २ लांच, ३ फितूर, व ४ यु चार
होंनीं १ शत्रु. २ मित्र व ३ उदासीन हे ति य
करावे. १ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस, ५
विषय घेणारी पांच इंद्रियें जिंकून, १
लोभ, ४ मोह, ५ मद, आणि ६ मत्स-
ओळखावें. १ स्त्री, २ द्यूत, ३ जीवहिं
कठोर भाषण, ६ लहान अन्यायास
आणि ७ दुसऱ्यांची गोष्ट खोडणें हीं

सुखी व्हावें. विष एकास मारितें, व शस्त्र एकाचा जीव घेतें; परंतु राजाची गुह्य गोष्ट फुटली असतां राजा, प्रजा, यांसुद्धां राज्याचा नाश होतो; ह्मणून राजाची गुह्य गोष्ट बोलूं नये. एकट्यानें गोड गोड खाऊं नये. एकट्यानें सर्व द्रव्य घ्यावयाची इच्छा करूं नये. एकट्यानें दूर वाट चालूं नये. आणि पुष्कळ निजले असतां एकट्यानें जागत बसूं नये. ज्यास दुसरी उपमा नाहीं, ज्याचा महिमा परम गहन, जे स्व र्गाचे मार्गाची पायरी, जशी समुद्र तरावयास नौका, सत्य त्यास कदापि सोडूं नये. क्षमावान् पुरुष दये- कोणास उपद्रव करीत नाहीं, ह्मणून लोक त्यास नि- ह्मणतात; परंतु त्याजमध्यें हा दुर्गुण असें ह्मणूं नये. सारिखें दुसरें बळ नाहीं; अशक्तास क्षमा हा गुण होय. र्थ्यवानास क्षमा हें भूषण होय; क्षमेनें सर्व वश होतात, सर्व मिळतें; क्षमारूप तरवार हातीं आल्यावर करितील ? ज्यास क्षमा नाहीं तो फार क्रूर कर्म पडतो. धर्माहून दुसरें पुण्य नाहीं. क्षमेहून नाहीं. विद्येहून दुसरी तृप्ति नाहीं. कोणा- करणें ह्यासारिखें दुसरें सुख नाहीं.

लोकीं शोभतातः—१ जो मृदु बोलतो, आणि करितो तो. दोन दुसऱ्यास विश्वास एका स्त्रानें जी वस्तु मिळविली ती पा- इच्छिचे, आणि २ एकाचें एकानें पू- दुसराही त्यालाच पूजितो. दोघं आपलें

शरीर आपणच्च शोषितातः—१ थोडें मिळत नसतां मोठा लाभ इच्छितो तो, आणि २ द्रव्य मिळवायाचें सामर्थ्य नसतां मिळत नाहीं ह्मणून रागास चढतो तो. न करायाचें कर्म केल्यावर बहुतकरून हे दोंघे शोभत नाहींतः—१ घरबारी असून संसाराचा उद्योग सर्व सोडितो तो, आणि २ संन्यासी असून गृहस्थांचीं कर्मे करितो तो. दोंघे स्वर्गी राहतातः—१ दरिद्री असून दाता; आणि २ राजा असून कृपाळु. सत्कर्मानें मिळविलेल्या द्रव्याच्या ह्या दो[illegible] अमर्यादा होतः—१ कुपात्रीं देणें; २ सत्पात्रीं न देणें. [illegible] यांस गळ्यामध्यें दगड बांधून पाण्यांत बुडवावें:—१ [illegible] व्यवान् असून धर्म करीत नाहीं आणि २ दरिद्री [illegible] ईश्वराकडे चित्त लावीत नाहीं त्यास. या लोकीं म[illegible] उपाय तीनः—१ युद्ध करणें, हा कनिष्ठ, २ फितुर करणें [illegible] मध्यम, ३ सल्लखीनें चालणें, हा उत्तम. तीन प्रकार[illegible] तीन कर्मास योजावे:—१ चांगला पुरुष चांगल्या [illegible] २ सामान्य पुरुष सामान्य कर्मास, आणि ३ [illegible] नीच कर्मास. १ स्त्री, २ पुत्र, आणि ३ [illegible] निर्धन ह्मणावे; कारण हे ज्याचे ह्मणविता[illegible] मिळविलेल्या द्रव्याचा धनी होतो. १ दुसऱ्[illegible] घेणें, २ दुसऱ्याचे स्त्रीस शिवणें, व ३ इ[illegible] तीन दोष आपल्या नाशाचे कारण होत[illegible] व ३ लोभ हे तीन अनर्थांत टाकणारे [illegible] डावे. १ देवापासून वर मिळाला तो ल[illegible]

व ३ पुत्रलाभ; परंतु त्र्रूला संकटापासून सोडवावा हें या तीहींपेक्षां अधिक थो तिवांस कदापि अंतर देऊं नयेः—१ ज्याला आपला असें ह्मटलें, २ जो आपली सेवा करितो, ३ जो आपणास शरण आला.

या चौघांबरोबर राजानें मसलत करूं नयेः—१ मूर्ख, २ चेंगट, ३ आळशी आणि ४ खुशामती. हे चौघे आपल्या घरांत बाळगायस योग्य होतः—१ आपल्या जातीचा ह्मातारा, २ कुलीन, ३ गरीब सखा, आणि ४ जिला लेंकरूं नाहीं ती बहीण. हे चार सद्यां फळ देणारीं होतः—१ देवाहीं इच्छिलेली गोष्ट, २ तपस्वी यांचें वाक्य, ३ विद्या ...सून नम्रता, आणि ४ पापकर्म. हे पांच अग्नि असें समजावेः—१ बाप, २ आई, ३ विवाहांत होम केला तो ... देह, आणि ५ गुरु. १ देव, २ पितर, ३ सुमनुष्य, ... आणि ५ अतिथी, या पंचांस. पूजिल्यावर ...ईल, ... मित्र, २ शत्रु, ३ मध्यस्थी करणारा, ४ व... ...श्रित हे पांच जेथें जेथें राजा जातो तेथें ...र्ते. जसें पाण्याचे पखालीस भोंक पडलें ...पाणी हळूहळू निघून जातें, तसें १ ...त्र, ...ु, ४ जिव्हा, आणि ५ घ्राण या पांच इंद्रि... नाश पावलें असतां तितकी बुद्धि हळूहळू ...म्हणून इंद्रियें राखावीं. हे सहा दोष संपत्ति ...डावेः—१ निद्रा, २ निद्रेसंबंधीं आळस, ३ भय, ... आळशीपणा, आणि ६ धिमेपणा. १ चौ-

उतारू नावाड्यास विसरतो, आणि ६ बरा झाल्यावर रोगी वैद्यास विसरतो. १ निरोगी शरीर, २ ऋण नसणें, ३ प्रवास नसणें, ४ साधूंशीं संगत असणें, ५ अन्न वस्त्र असणें, आणि ६ निर्भय जागीं राहणें, हीं सहा मृत्युलोकींचीं सुखें होत. १ सोसिक नव्हे तो, २ दयाळू, ३ असंतोषी, ४ क्रोधी, ५ नित्य ज्याच्या चित्तांत शंका तो, आणि ६ दुसऱ्याच्या भाग्यावर पोट भरणारा हे सहा नित्य दुःखी जाणावे.

१ स्त्रियांचा छंद, २ द्यूत, ३ पारध, ४ मद्यपान, ५ कठिण भाषण, ६ लहान अन्यायास मोठी शिक्षा; आणि ७ अन्यायानें द्रव्य मिळवणें, हे सात दुर्गुण राजानें टाकावे. १ मित्राची संगति, २ पुष्कळ द्रव्यप्राप्ति, ३ पोटीं सुपुत्र, ४ पाहिजे तशी बायको, ५ प्रसंगीं गोष्ट सुचणें, ६ आपल्या कुळामध्यें कुलदीपक असणें, ७ इच्छिली वस्तु प्राप्त होणें, आणि ८ सभेमध्यें सन्मान होणें, हे आठ गुण पुरुषास शोभा आणितात. १ सुबुद्धी, २ सुकुळांत जन्म, ३ मन स्वाधीन, ४ शास्त्राध्ययन, ५ पराक्रम, ६ बोलकेपणा, ७ आपल्या शक्त्याप्रमाणें दान करणें, ८ दुसऱ्यानें केलेले उपकार स्मरणें, आणि ९ शरीर हेंच कोणी एक घर जाणावें. ज्यास डोळ्यांचीं भोकें, २ नाकाचीं, २ कानचीं, १ तोंडाचें, मलद्वार, आणि १ मूत्रद्वार, अशीं नऊ द्वारें आहेत; १ सत्त्व, २ रज, व ३ तम हे तीन खांब आहेत; यांचे साक्षी तत्त्वः—१ पृथ्वी, २ आप, ३ तेज, ४ वायु, व ५ आकाश. करितो आणि या शरीराचा धनी जीवात्मा आंत राहणारा

असें जो जाणतो तो शहाणा जाणावा. हे दहा जण आपलें बरें किंवा वाईट समजत नाहींत:—१ मद्यपि, २ विषयासक्त, ३ उन्मत्त, ४ थकलेला, ५ कोपिष्ट, ६ भुकेलेला, ७ उतावळा, ८ लोभी, ९ भ्याड, व १० कामातुर. जो काम क्रोध सोडितो, सत्पात्र पाहून कांहीं देणें तें देतो, उत्तम, मध्यम व कनिष्ठ कोणतें हें तारतम्य जाणतो, शास्त्र जाणतो आणि युक्तीनें लवकर कार्य करूं जाणतो; अशा पुरुषास सर्व लोक वंदितात. लोकांनीं विश्वास धरावा असेंच जो आचरण करितो; पक्का अपराधी ठरल्यावांचून दंड करीत नाहीं; दंड करणें तो अपराधासारिखा करितो; आणि क्षमेस योग्य अशा अपराध्यास क्षमाच करितो; अशा पुरुषास लक्ष्मी स्वयें वरिते. दुर्बळाची अवज्ञा करीत नाहीं; सामुग्री सिद्ध करून शत्रूवर जातो; बळवंताशीं वैर करीत नाहीं; व आपला चढतकाळ पाहून युद्धास उभा राहतो, तो धीर जाणावा. विपत्काळीं स्वस्थ राहून उद्योग करित असतो; व समयीं दुःखही साहतो; असा जो त्यानें शत्रु जिंकिले असेंच ह्मणावें. जो व्यर्थ प्रवास करीत नाहीं; पातक्याची सोबत करीत नाहीं; परस्त्रीस स्पर्श करीत नाहीं; थोड्यासाठीं वाद करीत नाहीं; दुसऱ्यानें सत्कार न केला तरी रागें भरत नाहीं; आपणास जें जें उचित तें तें कंटाळोन करीत नाहीं; बोलविलें असतां सत्य तेंच बोलतो; आणि ढोंग, चोरी चहाडी, मद्यपान हीं करीत नाहीं; तोच लोकीं एक सुखी समजावा.

जो दुसऱ्याची अदेखाई करीत नाहीं; कोणाचीही ज्यास दया येते; आपण दुर्बळ असून समर्थाच्या आव घालीत नाहीं, व कोणीही वाईट बोलला तथापि साहतो; असा पुरुष प्रशंसेस योग्य होतो. जो उद्धटपणा करीत नाहीं; आपला थोरपणा पुढें करून दुसऱ्याचा तिरस्कार करीत नाहीं आणि कोणास कठिण बोलत नाहीं; अशा पुरुषाचें सर्व लोक हितच करितात.

जो मागें पडलेलें वैर पुनः उत्पन्न करीत नाहीं, गर्वाचे स्वाधीन होत नाहीं व प्रबळ असतांही कुकर्म करीत नाहीं; अशा पुरुषास शिष्टही मान देतात. आपणांस सुख झालें ह्मणून हर्ष मानीत नाहीं, दुसऱ्याचे दुःखानें ज्याचें चित्त कळवळतें आणि एक वेळ दुसऱ्यास वस्तु दिल्यावर मग तिचा खेद करीत नाहीं; अशा पुरुषास सत्पुरुष असें ह्मणावें. जो देशाचार, देशभाषा, व जातिधर्म जाणूं इच्छितो; आणि जो उत्तम कोण व अधम कोण याचा विचार ठेवितो; असा पुरुष जेथें जेथें जातो तेथें तेथें सर्वांचा धनी होतो. दंभ, मोह, मत्सर, पापकर्म, राजद्रोह, चहाडी, बहुतांशीं वैर आणि मद्यपी, उन्मत्त, अथवा दुर्जन यांशीं वाद, हीं जो सोडितो तो प्रधानाचे पदवीस योग्य होतो. दान, होम, कुळदैवत पूजन, शुभकर्में व प्रायश्चित्तें हीं जो नित्य करितो त्यास देवही मानितात. समानाशीं वाद करितो, नीचाशीं करीत नाहीं; व गुणवान् पुरुषाचा बहुमान करितो; अशा पुरुषास थोरही मानितात. आपल्या आश्रि-

तांचा समाचार घेऊन स्वयें परिमित भक्षितो, अपरिमित कर्म करितो, परिमित निजतो आणि शत्रूंनीं जरी याचना केली तथापि त्यांस देतो; अशा पुरुषास अनर्थ कधींही प्राप्त होत नाहीं.

ज्याचे मतांतील बरी किंवा वाईट गोष्ट इतर लोक जाणत नाहींत, जो आपला मनसुबा फार गूढ राखावयास जाणतो, ह्मणून त्याचें कोणतेंही काम कधींच बिघडत नाहीं; जो सर्व भूतांचें कल्याण करावयास उद्योग करितो, जो सत्य आणि मृदु भाषण करितो, दुसऱ्यांचा मान राखितो ज्याचें मन सरळ; तो जातीमध्यें उत्तम खाणींतील हिऱ्याप्रमाणें फार शोभतो. आपल्या हातानें कधीं एखादें वाईट कर्म घडलें तरी जो आपणच लाजतो, तो सर्व लोकांमध्यें श्रेष्ठ होतो; कारण अशा पुरुषापासून पुनः वाईट कर्म कधींही घडत नाहीं. जो प्रतापी असून निरंतर समाधान वृत्ति आणि निर्मळ चित्त असतो, तो लोकांमध्यें सूर्यासारखा शोभतो. असे शहाण्याचे धर्म आहेत. याकरितां शापदग्ध पंडु राजाचे जे पांच पुत्र इंद्रासारिखे पराक्रमी त्यांस तूं बाळपणापासून वाढविलेंस व शिकविलेंस. तुझी आज्ञा ते मानितात; तस्मात् त्यांचा राज्यभाग त्यांस दे, आणि पुत्रांसहित सुखी रहा; ह्मणजे देव किंवा मनुष्य मला काय ह्मणतील अशी शंका तुला येणार नाहीं.

# अध्याय दुसरा:

धृतराष्ट्र बोलतो:—हे विदुरा, आह्मी मुळापासून पांडवांचे अपराधच करीत आलों आहों, त्यांचे फळ आह्मांस प्राप्त होईल, हें त्वां नीति उपदेशिली त्यावरून मला उघड दिसून आलें; तेणेंकरून मी फार भयभीत आहें; तर अशा समयीं तूं धर्मराजाचे मनांतील अभिप्राय घेऊन जेणेंकरून पांडवांचें व आमचें कल्याण होईल तो उपाय सांग. असें धृतराष्ट्राचें भाषण ऐकून विदुर ह्मणतो, एखाद्याचें कल्याण व्हावें असें जरी आपले मनांत आहे, तरी त्यानें पुसल्यावांचून त्याचें पाप किंवा पुण्य, हित किंवा अहित कांहींच बोलूं नये. आतां तूं पुशिलेंस ह्मणून मला बरें दिसत आहे तें सांगतों, श्रवण कर.

जीं जीं कर्मे खोटे उपायांनीं साध्य केलीं, त्यांचा परिणाम वाईट हा निश्चय मानून अशा कर्मांकडे अतःपर चित्त घालूं नको. तूं ह्मणशील कीं, खोटे उपाय सोडून सरळ मार्गानें जीं कर्मे केलीं त्या सर्वांचा शेवट बराच होतो, परंतु हा तरी नेम कोठें आहे ? असा विपर्यास जेथें पडतो तेथें सुज्ञ आहे तो ईश्वरी इच्छा असें जाणून त्याचा खेद करीत नाहीं. ज्या कामास जें साहित्य पाहिजे त्याची पूर्वींच योजना करावी, उतावळीनें हात घालूं नये; जें काम करायाचें त्यास साहित्य किती पाहिजे तें पहावें; आरंभिलेलें कर्म

शेवटास जाईल असा आपला उद्योग आहे कीं नाहीं, हा सर्व विचार करून जें शेवटास जाईल असें असेल तेंच करावें.

जो राजा आपले किल्ल्याची बळकटी जाणत नाहीं, तसेंच आपला काळ अनुकूल आहे कीं नाहीं, द्रव्य भरपूर आहे कीं नाहीं, देश सुभिक्ष आहे कीं नाहीं, व आपली सेना बळकट आहे कीं नाहीं; हें सर्व पाहत नाहीं, तो राजा फार दिवस राज्य करीत नाहीं; आणि जो राजा हें सर्व जाणून उचित तेंच आचरितो, त्याचे राज्यास कधींही भंग नाहीं. राज्याधिकार प्राप्त झाला ह्मणून जो नम्रता धरीत नाहीं, त्या राजाची संपत्ति लवकर लयास जाते. जसें इंद्रियें स्वाधीन न ठेविल्यानें त्याचें तारुण्य लवकर लयास जातें, जसा मासा गळास डसविलेलें मांस पाहून खावयास जातो, परंतु त्या मांसाचे अंत लोखंडाचा कांटा आहे तो आपले गळ्यास रुतून प्राण घेईल हें पहात नाहीं; तसें विचारवंत पुरुषांनीं करूं नये. जो पदार्थ आपल्यास खावयास योग्य आहे, जो खाऊन जिरविण्याची आपले आंगीं शक्ति आहे, आणि जो जिरला असतां सामर्थ्य देईल असा असेल तोच भक्षावा. जो वृक्षाचें हिरवें फळ तोडितो, त्याला त्या फळाची गोडी सांपडत नाहीं, आणि त्यांतील बीही उपयोगास पडत नाहीं. जो पिकलें फळ काढितो, तो त्या फळापासून रस घेऊन त्यांतील बीजापासूनही दुसरीं फळें लाभतो; जसा भ्रमर फुलें राखून फुलांतील मध मात्र घेतो;

जसा माळी झाडापासून पुष्पें व फळें घेतो, पण मुळास दुखवीत नाहीं, तसें राजानें प्रजेस दुखविल्यावांचून त्याजपासून युक्तीनें थोडें थोडें द्रव्य घेत असावें.

किती एक कामें अशीं असतात कीं, उद्योग केल्यावांचून काळें करून आपले आपण साध्य होतात, पण तींच आज उद्योग केल्यानें साध्य होत नाहींत; तर हा विचार करून कर्तव्य तें करावें. नपुंसक पुरुषास जशा स्त्रिया इच्छीत नाहींत, त्याप्रमाणें जो राजा प्रसन्न झाला असतां हित करूं शकत नाहीं, अथवा कोपला असतां उपद्रव करूं शकत नाहीं अशा राजास प्रजा इच्छीत नाहींत. किती एक गोष्टी अशा आहेत कीं, थोडके आयासानें साध्य होऊन मोठें फळ देताव, तर अशांकडे शहाण्यानें चित्त ठेवीत जावें. ज्या राजाची सर्व प्रजेवर प्रीतिपूर्वक दृष्टि असते, त्या राजास प्रजाही प्रीतिपूर्वक पाहतात. १ जो शब्दानें व दृष्टीनें सेवकांवर प्रीति मात्र दाखवितो, परंतु त्यांचें हित करीत नाहीं; २ जो प्रसन्न झाल्यावर सेवकांस द्रव्यादिक देतो, परंतु ज्याची मर्जी संपादणें फार कठीण; आणि ३ जो आंत निर्बळ आहे, परंतु बाहेर अवसान घालून बलाढ्य असें दाखवितो; या तिघांपेक्षां जो दृष्टीनें, मनानें, शब्दानें, आणि उदारपणानें सर्वांस प्रसन्न ठेवितो, त्या राजास सर्व लोक अनुकूल होतात. जशीं सावजें पारध्यापासून त्रास पावतात, तसे सर्व लोक ज्या राजापासून भय पावतात त्या राजास दैवयोगानें समुद्रवलयांकित पृथ्वीचें राज्य साध्य झालें तथापि तो रा-

ज्यभ्रष्ट होईल. अनीतीनें जो राजा चालतो, त्याचें राज्य वडिलोपार्जित असलें तथापि जातें. राजाचे धर्माप्रमाणें जो राजा चालतो तो ऐश्वर्य वाढवितो, आणि धनधान्येंकरून युक्त अशा पृथ्वीचें राज्य करितो. जो अधर्मानें आचरण करितो त्या राजाला पाहून पृथ्वी आंखडते; जसें अग्नीमध्यें चामडें घातलें असतां वाळून आंखडतें.

जसा दुसऱ्याचें राज्य घ्यावयाकरीतां प्रयत्न करावा, त्या तोलीचा उद्योग आपलें राज्य पाळावयाकरितां प्रयत्न करावा. धर्मेंकरून ज्या राजास जें राज्य प्राप्त होतें, तें नीतीनें पाळिलें असतां त्यापासून लक्ष्मी प्राप्त होते, ती त्यास न सोडितां हळूहळू वाढतच जाते, ज्याप्रमाणें मृत्तिकेपासून सोनें घ्यावें, त्याप्रमाणें मस्त जें बडकेल, किंवा बाळक, जें बडबडेल, अथवा जो कोणी कांहीं बोलेल, त्यांत सार गोष्ट असेल तितकी घेत जावी. ज्याप्रमाणें रत्नपारखी एकेक चांगलें चांगलें रत्न निवडून घेऊन संग्रह करीत असतो, त्याप्रमाणें आई, बाप, गुरु व पंडित यांचे भाषणांतील चांगले चांगले गोष्टींचा संग्रह करीत असावा.

गायींस वासाचेयोगानें दिसतें; ब्राह्मणांस वेदद्वारें दिसतें; राजांस सेवक समजावितील तसें दिसतें; आणि वरकड लोकांस आपआपले डोळ्यांनीं दिसतें. जी गाय सुखानें दूध देत नाहीं ती फार क्लेश पावते, आणि जिला दोहायास प्रयत्न लागत नाहीं ती क्लेश पावत नाहीं. जी वस्तु तापविल्यावांचून पाहिजे तशी लवते तिला कोणी तापवीत

नाहीं. काष्ठ स्वयें नम्र असल्यास त्यास शेकून लववीत नाहींत. ह्मणून तुह्मीं पांडवांशीं नम्र असावें; कारण ते बलवान् आहेत.

पशूंस पर्जन्याचें बळ, राजांस प्रधानांचें बळ, स्त्रियांस पतीचें बळ, आणि ब्राह्मणांस वेदांचें बळ. सत्यानें धर्म राहतो, अभ्यासानें विद्या राहते, तेल उटण्यानें रूप राहतें, धर्माचरणानें कुळाचें रक्षण होतें. मोज माप लक्षांत ठेविल्यानें धान्याचें रक्षण होतें. फेरफटक्यानें घोड्याचें रक्षण होतें, देखरेख ठेविल्यानें गायींचें रक्षण होतें, आणि उणास्त्र वस्त्र नेसविल्यानें स्त्रियांचें स्थितीचें रक्षण होतें. थोर कुळांत जन्मला आणि आचारहीन असला तर तो थोर नव्हे. अंत्यजाचे कुळांत जन्मला, आणि आपल्या आचरणानें राहिला तर तो थोर ह्मणावा. दुसऱ्याचें द्रव्य, रूप, पराक्रम, किंवा थोर कुळ पाहून ज्याला वैर वाटत नाहीं, त्याचें सुख किंवा संपत्ति हीं त्यास नित्य रोगासारखीं जाच करितात. न करायाचें कर्म करायास भितो, करायाचें कर्म करायास भितो, केलेली मसलत पार पडायाचे अगोदर लोकांस कळेल ह्मणून भितो; असा सर्वत्रच भितो, त्या पुरुषानें जें करणें तें सावधगिरीनें करावें.

१ विद्या, २ धन, व ३ आप्त जनांचें साहित्य हीं तीन गर्विष्टास प्राप्त झालीं असतां तो चढून जातो; परंतु हींच सज्जनांस अनुकूल झालीं असतां तो अधिक नम्र होतो. कांहीं कार्यामुळें सज्जनानें दुर्जनाचा बहुमान केला असतां

तो, तितक्यानेंच आपण सज्जन असें मानितो; आपला दुर्जनपणा सर्व लोकांस ठाऊक आहे, हें त्याचे लक्षांत रहात नाहीं. आत्मज्ञान्यास साधु पुरुषांवांचून गति नाहीं; साधूंस साधूच गति; परंतु साधूंस असाधूंचा उपयोग नाहीं; चांगलें वस्त्र अंगावर घेणारानें सभा जिंकिली; दुभतें ज्याचें घरांत आहे त्यानें स्वादिष्ट पदार्थ खाण्याची आशा जिंकिली; वाहनावर बसून जाणारानें मार्ग जिंकिला; आणि ज्याचा स्वभाव चांगला, त्याणें सर्व जिंकिलें; ह्मणून पुरुषास चांगला स्वभाव असणें हें मुख्य होय. तो स्वभाव ज्यास नाहीं, त्यास धन असून, बंधु असून, आणि जिवित असून काय फळ! तीं सर्व व्यर्थ होत. राजादिक थोरांचे भोजनांत मांस मुख्य, मध्यम लोकांचे भोजनांत गोरस मुख्य, आणि गरीबांचे भोजनांत तेल मुख्य. कसेंही असलें तरी गरीबांस गोड लागतें, कारण त्यांस भूक स्वाद उत्पन्न करितें; तो स्वाद इतरांस नाहीं. बहुतकरून श्रीमंतांस भोजनाची शक्ति थोडीच असते. गरीबांनीं लांकडें खाल्लीं तथापि तीं त्यांस पचुतात. निकृष्ट जन पोट कसें भरेल ह्मणून भितात. मध्यम आहेत ते मरण येईल ह्मणून भितात, आणि उत्तम पुरुष अपमान होइल ह्मणून भितात. सुरापानादिकेंकरून जो मत्त होतो तो कांहीं घटिकांनीं सावध होतो, परंतु ऐश्वर्यमदानें जो मत्त झाला तो दरिद्री झाल्यावांचून सावध होत नाहीं; ह्मास्तव ऐश्वर्य आलें असतां मत्त होणें हें मोठें पापाचें फळ. ज्यानें इंद्रियें स्वाधीन राखिलीं नाहींत, त्याचे आचरणानें

सर्व लोकांस पीडा होते व त्यासही होते. शब्दविषय ह्मणजे मंजुळशब्देंकरून मन हरण करितात अशा वस्तु, स्पर्श ह्म-णजे अंगास लागून सुख देतात अशा वस्तु, रूप ह्मणजे सुंदरपणानें भुलवितात अशा वस्तु, रस ह्मणजे जिभेस स्वा-दिष्ट लागतात अशा वस्तु, आणि गंध ह्मणजे सुवास देऊन संतुष्ट करितात अशा वस्तु. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, हे पांच विषय ह्मणावे; हे ज्यानें स्वाधीन ठेविलें नाहींत, त्या पुरुषाच्या विपत्ति शुक्ल पक्षींच्या चंद्राच्या कलांप्रमाणें वाढत असतात. मन जिंकिल्यावांचून जो इंद्रियें जिंकायाची इच्छा करितो, त्यास इंद्रियेंच कामक्रोध वैऱ्यांचे हातीं देतात; ह्म-णून प्रथम मन जिंकावें. ज्यानें मन व इंद्रियें जिंकून काम-क्रोधादिक वश केले, व जो कोणतीही गोष्ट पुनः पुनः वि-चार करून करितो, त्या पुरुषास लक्ष्मी स्वयें अनुकूळ होते. पुरुषाचें शरीर हा कोणी एक रथ ह्मणावा; त्याचा सारथि मन होय, आणि इंद्रियें हे घोडे होत. हे घोडे जर स्वाधीन असतील, तर जसा कोणी प्रत्यक्ष रथांत बसून सुख पावतो तसा याचाही आत्मा सुखें पावेल.

जो उचित कर्में सोडून जशी आपल्या इंद्रियांची इच्छा असेल तसें वर्ततो, तो वैभव, प्राण, धन व स्त्री, यांपासून लवकर भ्रष्ट होतो. जो विषयांचा धनी होतो, आणि इंद्रि-यांचा धनी होत नाहीं, तो इंद्रियें स्वाधीन नाहींत ह्मणून धनीपणापासून भ्रष्ट होतो. मन स्वाधीन असलें तर तें मनु मित्ररूप होतें; आणि स्वाधीन नसलें तर तेंच शत्रुरूप

होतें. काम; क्रोध हे दोवें मुख्य शत्रु होत; यांस फार जपावें जो आपलें शरीरांतील कामक्रोधादिक शत्रु जिंकिल्यावांचून बाहेरील शत्रूंस जिंकावयास इच्छितो, त्यास हे कामक्रोधादिक शत्रु आंतून उलटून पाडितात. इंद्रियें जिंकिल्यावांचून जे राजे राज्य करितात, ते ऐश्वर्यमदें करून राज्यभ्रष्ट होतात. रावणादिकांनीं इंद्रियें जिंकिली नाहींत, ह्मणून आतुर होऊन सीताहरणादिक दुष्ट कर्मे करून ऐश्वर्यासहवर्तमान प्राणास मुकले. पापकर्त्या पुरुषांचा त्याग न केला असतां पुण्यवानांस त्या पातक्यांच्या संगतीनें त्यांचें अर्धें पातक लागतें; जसें सुक्या लांकडांच्या संगतीनें ओलींही जळतात; ह्मणून पातक्यांची संगति कदापि करूं नये.

दुष्ट पुरुषाचे ठिकाणीं हे आठ गुण राहत नाहींत; १ दुसऱ्याचें बरें पाहून संतोष मानणें, २ सरळपणा, ३ निर्मळता, ४ संतोष, ५ गोडभाषण, ६ इंद्रियदमन, ७ सत्यभाषण आणि ८ शांति. दुष्ट जो आहे तो कठीण भाषण आणि निंदा यांहींकरून थोरांची छळणा करितो; त्याचें पाप निंदा करणारास लागतें; आणि जो साहतो त्यास पुण्य लागतें. दुष्टांजवळ दुसरें बळ नाहीं; कोणाचा घात करावा हेंच त्यांचें बळ. दुसऱ्याचें पारिपत्य करणें स्वाधीन आहे हें राजाचें बळ. आपल्या भ्रताराची सेवाकरून त्याची मर्जी संपादन करावी हें स्त्रीचें बळ; व गुणवान् पुरुष लोकांचे अन्याय क्षमा करितात हेंच त्यांचें बळ. मोजलेले शब्दांनीं भाषण करितां येणें फार अवघड आहे.

तसेंच फार बोलून बोलण्यामध्यें अर्थचमत्कार व शब्दचमत्कार न सोडणें हेंही अवघड आहे. सारांश फार भाषण सगळेंच चांगलें पडत नाहीं. बोलण्यामध्यें चांगले शब्द पडले असतां पुष्कळ हितकारक होतात, परंतु तेच वाईट पडले असतां अनर्थास कारण होतात. बाणांनीं छेदिलेलें, अथवा कुऱ्हाडीनें तोडिलेलें वन पुनः पूर्ववत् होतें; परंतु वाग्बाणांनीं जें क्षत पाडिलें तें पूर्ववत् नीट होत नाहीं. प्रत्यक्ष बाण शरीरास बाहेरून लागतो ह्मणून काढितां येतो, परंतु वाग्बाण शरीरांत प्रवेश करून काळजास झोंबतो ह्मणून तो काढितां येत नाहीं. वाग्बाण लागलेले पुरुषास रात्रंदिवस विश्रांति नाहींशी होते, ह्मणून थोर आहेत ते वाग्बाणांनीं दुसऱ्यास दुखवीत नाहींत. विदुर धृतराष्ट्रास ह्मणतो, तुह्मांपासून पांडवांचे अपराध फार घडले व त्यांची आजपर्यंत अवगणनाच झाली; तुझ्या पुत्रांनीं द्रौपदीस सभेंत आणून तिला, दुर्वचनांचे बाण मारिले व केश धरून ओढिलें हा मोठा अपराध केला. रावणानें सीता हरून मात्र नेली, परंतु तितक्यानें तो प्राणास मुकला; आणि तुह्मी तर फारच अमर्यादा केलीत. हे अपराध पाहून तुह्मांस दैवही कंटाळलें. आतां तुमचा विनाशकाळ जवळ आला असें मला वाटतें. कारण, ज्याचा विनाशकाळ जवळ आला, त्याचा बुद्धिभ्रंश होतो, त्यास वाईट कर्में बरींशीं वाटतात, खोटी गोष्ट खरीच वाटते, आणि दुसऱ्यानें खोटी ह्मणून सांगितली तथापि ती त्यास खोटी वाटत नाहीं.

पांडवांशीं विरोध पडून तुझ्या पुत्रांचा बुद्धिभ्रंश झाला आहे, आणि अशांवर तूं परम स्नेह ठेविलास ह्मणून तुझेही बुद्धीस विपर्यास पडला हें तुला कसें समजत नाहीं ? तर आतां सकळ राजलक्षणांनीं युक्त, त्रैलोक्याचेंही राज्य करावयास समर्थ, आणि तुझ्या पुत्रांपेक्षां तुझी आज्ञा अधिक पाळणारा, तसाच राज्याभिषिक्त पंडूचा वडील पुत्र ह्मणून राज्यास अधिकारी, असा जो धर्मराज त्यास राज्यासनीं स्थापण्याविषयीं तुला बुद्धि होवो. धर्मराजाचे गुण किती वर्णावे ! जो आपलें राज्य दुर्योधन करितो आहे हें प्रत्यक्ष पाहूनही अद्यापि क्षमाच करितो, कारण झुंजावयास निघाल्यानें प्राणिमात्रांस उपद्रव होईल, व तुझा अपमान होईल या बुद्धीनें त्यानें तुझे पुत्रांचे हातून पुष्कळ अपमान, व क्लेश आजपर्यंत सोशिले; तर आशा पुरुषाशीं अतःपर तुमचा स्नेह होईल तें त्वां वडिलपणें पुढें होऊन करावें असें मला वाटतें.

---

# अध्याय तिसरा.

---

धृतराष्ट्र ह्मणतो, हे विदुरा, तूं फार चांगलें भाषण करितोस. त्यामुळें तें ऐकतांना माझी तृप्तिच होत नाहीं, तर आणखीही कांहीं सांग. हा राजाचा आदर पाहून विदुर

बोलतो, हे राजा, सर्व तीर्थांचे ठायीं स्नान, आणि प्राणिमात्रांशीं प्रीति हीं दोन्हीं पुण्याविषयीं थोर होत; आणि त्यांतही प्राणिमात्रांशीं प्रीति ठेवणें हें सर्व तीर्थस्नानांपेक्षां अधिक होय; ह्मणून तूं पुत्रांसहित कपटवृत्ति सोडून पांडवांशीं स्नेह करून सुखी हो. तेणेंकरून तूं या लोकीं कीर्ति मिळवून देह सोडिल्यानंतर स्वर्गास जाशील. जोंपर्यंत या लोकीं पुरुषाची पुण्यकीर्ति लोकांचे तोंडीं राहते, तोंपर्यंत तो पुरुष स्वर्गी वास करितो याविषयीं तुला एक पुरातन कथा सांगतो ती ऐक.

पूर्वी कोणीएका राजाची केशिनी नामक कन्या रूपानें फार सुंदर होती. आपणास उत्तम पति मिळावा अशी तिची इच्छा आहे, असें तिच्या पित्यानें पाहून तिचें स्वयंवर आरंभिलें. तें ऐकून प्रल्हादाचा पुत्र विरोचन नामक दैत्य ती स्त्री आपणास प्राप्त व्हावी ह्मणून तेथें आला. असतां त्याचा कांहीं छळ करावा ह्मणून केशिनी त्यास प्रश्न करिते, हे विरोचना, ब्राह्मण श्रेष्ठ कीं दैत्य श्रेष्ठ तें सांग? जर ब्राह्मण श्रेष्ठ ह्मणशील तर सर्वांस मान्य अशा गाद्यांसनीं तुह्मी बसतां, आणि ब्राह्मण कां बसत नाहींत? जर देव थोर ह्मणशील तर सर्व लोक ब्राह्मणांची पूजा कां करितात? हें ऐकून विरोचन उत्तर करितो, आह्मीं विश्वसृष्टच्या प्रजापतीपासून झालों आहों, ह्मणून आह्मी सर्वांहून श्रेष्ठ, इतर लोक आह्मांखालीं; आह्मांपुढें देव व ब्राह्मण हे काय पदार्थ! तें ऐकून केशिनी ह्मणते, या गोष्टीची परिक्षा येथेंच

पाहूं. अंगिऱ्याचा पुत्र सुधन्वा ब्राह्मण उद्यां प्रातःकाळीं एथें येणार आहे, त्या वेळेस तूंही ये.

दुसरे दिवशीं प्रातःकाळीं विरोचन व सुधन्वा हे केशिनीपाशीं आले; तेव्हां ती सुधन्व्यास पाहातांच उभी राहिली आणि त्यास दर्भासन बसायास देऊन अर्घ्यपाद्यादिकेंकरून त्याची पूजा करिती झाली. तिनें विरोचनास स्वर्णमय आसनावर बसविलें होतें. त्या वेळेस विरोचन आपली थोरवी उघड करावी ह्मणून सुधन्व्यास बोलतो, हे ब्राह्मण, तूं तें दर्भासन सोडून या स्वर्णमय आसनावर मज जवळ येऊन बैस. तें ऐकून आणि त्याचे मनांतील अभिप्राय जाणून सुधन्वा उत्तर करितो, हे विरोचना, मी तुजबरोबर बसावें हें मला उचित नाहीं. तेसमयीं विरोचन क्रोधयुक्त होऊन बोलतो, अरे भट्टा, तूं बोलतोस तेंच खरें, तुझी आमची बरोबरी नाहीं; तूं लांकडाचे तुकड्यावर अथवा गवतावर बसणारा, आणि आह्मी स्वर्णमय आसनावर बसणार; तस्मात् तूं आणि मी एकत्र नसावें हें मलाच योग्य नाहीं. तेव्हां सुधन्वा उत्तर करितो, हे विरोचना, तुझा बाप प्रल्हाद मला स्वर्णमय आसनावर बसवून आणि मज पुढें उभा राहून माझी सेवा करितो हें तूं आठवित नाहींस ? विरोचन ह्मणतो, आपले घरीं चालून आला तो श्रेष्ठ मानून त्याचा सत्कार करणें, हें थोरांचें लक्षण शास्त्रांत सांगितलें आहे, ह्मणून तुला उच्चस्थानीं

बसवून माझा बाप तुजपुढें उभा राहतो; यांत थोरपणा कोणाकडे येतो याचा विचार कर.

याप्रमाणें उभयतांचीं उत्तरें व प्रत्युत्तरें झाल्यावर विरोचन बोलतो, हे ब्राह्मणा, आह्मी दैत्य सर्व प्रकारें थोर अशी गोष्ट पदरीं घेऊन अतःपर आपल्या ज्ञातीचे महत्वाचा अभिमान सोड, हें न करशील तर आपण •कांहीं तरी द्रव्याचा पण करून तिऱ्हाइतापाशीं जाऊंया; आणि मग तो सांगेल तें उभयतांनीं मान्य करावें. त्यावर सुधन्वा बोलतो, आह्मां ब्राह्मणांपाशीं द्रव्यसंपत्ति असावयाची नाहीं; तर तुझा आमचा पण हाच कीं, जो हरेल त्यानें अग्निकाष्ठें भक्षावीं. तिऱ्हाईत कोण ह्मणशील तर तुझाच बाप प्रल्हाद. तो सत्यशील आहे, ह्मणून तुजकरितां देखील कधीं खोटें बोलणार नाहीं. विरोचनानें तो पण मान्य केल्यावर ते उभयतां प्रल्हादापाशीं गेले. त्या वेळेस प्रल्हादानें सुधन्व्याचा सत्कार करून येण्याचें कारण विचारिलें, तें सुधन्व्यानें सांगितल्यावर प्रल्हाद बोलतो, हे सुधन्व्या, विरोचन हा माझा एकुलता एक पुत्र, आणि तूं ब्राह्मण महा तपस्वी; ह्मणून मला उभयपक्षींही बोलवत नाहीं. तें ऐकून सुधन्वा बोलतो, तूं राजा न्यायकर्ता आहेस, ह्मणून आह्मीं उभयतां वादी तुजपाशीं आलों आहों. ह्याजकरितां पुत्राचें अथवा ब्राह्मणाचें नातें मनांत न आणितां सत्य असेल तें बोल; येथें भीड धरशील तर दोषी होशील. तूं पक्षपात न करितां जें वास्तविक दिसेल तें सांग, तुला भय

नाहीं. तें ऐकून प्रल्हाद सुधन्व्यास पुसतो, जो खरें खोटें जाणतो परंतु दोन्ही बोलत नाहीं, अथवा जो खोटी साक्ष देतो किंवा खोटा न्याय करितो त्यास काय पातक लागतें आणि त्या पातकापासून या लोकीं अथवा परलोकीं त्यास काय दुःख होतें, तें सांग. मग सुधन्वा, ह्मणाला राजा ऐकः—

एका पुरुषास दोन स्त्रिया असतांना त्यानें एकीवरच प्रीति केल्यामुळें जें दुःख दुसरीस होतें, द्यूतांत हरल्यामुळें जें दुःख द्यूत खेळणारास होतें, यजमानानें आज जसें मोठें ओझें डोकीवर दिलें तसेंच तो उद्यांही देईल हें मनांत येऊन जें दुःख सेवकास होतें, अथवा कोणी एखादा संभावित पुरुष वाट चुकून आणि क्षुधेनें पीडित होऊन एकटा भटकत असतां त्याचे शत्रूंनीं त्यास गांठिल्यामुळें जें दुःख त्यास होतें, तें दुःख खोटी साक्ष देणारास प्राप्त होतें. शेळी इत्यादिक लहान पशूंसाठीं जो असत्य बोलतो, तो आपल्या पांच पूर्वजांसहित नरकास जातो; गाईसाठीं खोटें बोलतो, तो दहा पूर्वज घेऊन नरकास जातो; घोड्यासाठीं जो खोटें बोलतो तो शंभर पूर्वज घेऊन नरकास जातो; मनुष्यासाठीं खोटें बोलतो तो सहस्र पूर्वजांसहित नरकास जातो; जो द्रव्यासाठीं खोटें बोलतो, तो पूर्वीं झालेले पुरुष आणि पुढें होणारे पुरुष यांसहित नरकास जातो; आणि भूमिसाठीं असत्य बोलतो, त्याचें सर्वस्व नाश पावतें. तसेंच जो खरें खोटें जाणून साक्ष पुसली असतां ती देत नाहीं अथवा काम, क्रोध, लोभ इत्यादिकांच्या आधीन

होऊन खऱ्याचा खोटा न्याय करितो, त्यासही पातक लागून असेंच दुःख प्राप्त होतें. केशिनी ही उत्पत्ति करण्याविषयीं भूमीसमान आहे, ह्मणून तूं येथें खोटें बोलणें सर्वथा वर्ज करावें. तें ऐकून प्रल्हाद आपल्या पुत्रास ह्मणतो, विरोचना, मजपेक्षां सुधन्व्याचा पिता अंगिरा श्रेष्ठ, तुझे मातेहून याची माता श्रेष्ठ, आणि तुझ्याहून सुधन्वा श्रेष्ठ आहे. सुधन्व्यानें तुला जिंकिलें. आतां तो तुझ्या प्राणाचा धनी आहे. ह्याप्रमाणें बापाच्या तोंडचीं अक्षरें ऐकून विरोचन फार खिन्न झाला. तें पाहून प्रल्हाद सुधन्व्याची प्रार्थना करितो, हे ब्राह्मणा, आतां तूं माझा पुत्र मला प्राणासहित कृपा करून दिला पाहिजे हें तुजपाशीं मागतों. तव्हां सुधन्वा प्रसन्न होऊन बोलतो, प्रल्हादा, पुत्राची ममता न धरितां सत्यवचन बोललास, तस्मात् तूं धन्य आहेस; मी तुझा पुत्र तुला प्राणासहित दिला. आतां केशिनी याची स्त्री होवो. असा आशिर्वाद देऊन सुधन्वा आपल्या आश्रमास जाता झाला.

या प्रकारें तो प्रल्हाद पुत्राचा पक्षपात न धरिल्यानें पुत्रासहित सुखी झाला. ही त्याची पुण्यकीर्ति त्या दिवसापासून सर्व लोक गात आहेत, अशी कथा सांगून विदुर ह्मणतो, राजा, पुत्रास पृथ्वी पाहिजे ह्मणून पृथ्वी मिळवावयासाठीं असत्य बोलून पुत्र व प्रधान यांसहित आपला नाश करूं नको. गोवारी जसा हातीं काठी घेऊन गाईस राखितो तसे देव हातीं काठी घेऊन सर्व मनुष्यांस राखीत

नाहींत. ज्या पुरुषास ते राखूं इच्छितात त्यास उत्तम बुद्धि देतात; ती त्याची कृपा समजावयाची. ज्या ज्या प्रमाणें मनुष्य चांगल कर्म करितो त्या त्या प्रमाणें त्याचे सकल मनोरथ सिद्ध होतात. ज्याचें ब्राह्मणकुलांत जन्म, आणि सर्वकाळ मुखांत वेद, परंतु अंतरीं मात्र कपट अशा पुरुषाचें रक्षण देवाच्यानेंही होत नाहीं, तेथें राजा, तुझी माझी काय कथा ? ह्मणून तूं कपट सोड. मद्यपान करणाराशीं गोष्टी करणें, निमित्तावांचून कलह करणें, बहुतांशीं वैर करणें, स्त्रीपुरुषांचा वियोग करणें, कुटुंबांत किंवा जातींत कज्जा लावणें, राजद्वेष करणें, स्त्रीपुरुषामध्यें वैर उत्पन्न करणें, आणि कुमार्गीं जाणें हीं सर्वथा वर्ज करावीं. साक्षीविषयीं हे सात योजूं नयेतः– १ सामुद्रिक लक्षण जाणतो तो, २ मापांत लबाडी करणारा वाणी, ३ जुगारी अथवा फांसे टाकून शकुनादिक सांगून लोकांस ठकवितो तो, आणि ४ पोटभरू वैद्य, या चौघांचें पैशाकडे लक्ष असतें ह्मणून यांस वर्ज करावें. त्याप्रमाणेंच ५ कदाचित् विपरीत साक्ष देईल ह्मणून शत्रु, ६ लोकांस खरें वाटणार नाहीं ह्मणून मित्र आणि ७ भडवा, शिनळ, अथवा कैफी पुरुष, हे सात साक्षी बोलवूं नयेत.

हीं चार सत्कर्मे अभय करणारीं आहेत, परंतु अविधीनें केलीं असतां महा भयकारक होतातः– १ लोकांनीं आपणास थोर ह्मणावें यासाठींच अग्निहोत्र घेणें, २ महत्वासाठीं मौन धरणें, ३ लोकांनीं ज्ञानी ह्मणावें ह्मणून अध्ययन करणें,

आणि ४ प्रतिष्ठेसाठीं यज्ञ करणें. हे अठरा प्रकारचे ब्राह्मण हत्या करणारासमान होतः– १. दुसऱ्याचें घर जाळणारा, २ विष घालणारा, ३ आपल्या स्त्रीस जारकर्मापासून झालल्या पुत्रनें मिळविलेल्या धनानें पोट भरणारा, ४ मद्य विकणारा, ५ बाणादिक शस्त्रें करणारा, ६ दुसऱ्याचे दोष लोकांस सांगणारा, ७ मित्राशीं द्रोह करणारा, ८. परस्त्रीशीं जाणारा, ९ औषधादिक देऊन गर्भ पाडणारा, १० गुरुपत्नीशीं जाणारा, ११ मद्यपान करणारा, १२ विश्वासघात करणारा, १३ दुःखितास दुःख देणारा, १४ परलोक खोटा ह्मणणारा, १५ वेदाची निंदा करणारा, १६ राजसत्तेचे बळानें लोखंडाची खोंची मारून धान्याचे कोयळ्यांतील अथवा मुडयांतील धान्य घेणारा, १७ स्वधर्म सोडून व्रात्य होऊन भटकत फिरणारा, आणि १८ शरणांगतास मारणारा. अंधारांत दिव्यानें समजतें; सदाचरणानें धर्म समजतो, आचरणानें साधु समजतो; भयप्राप्तीचे वेळीं शूर समजतो; दारिद्र्यांत धैर्य समजतें; आणि संकटकाळीं शत्रु अथवा मित्र समजतो. ह्मातारपण रूप नेतें; निराशा धैर्य नेते; मृत्यु प्राण नेतो; द्वेष धर्म नेतो; क्रोध लक्ष्मीचा नाश करितो; नीचसेवा उत्तम स्वभावाचा नाश करितें; काम लज्जेचा नाश करितो; आणि अभिमान सर्वांचा नाश करितो. लक्ष्मी सत्कर्मानें उत्पन्न होते, जपून चालल्यानें वाढते, आणि इंद्रियनिग्रहानें अक्षय होते. १ बुद्धिमानपणा, २ भलेपणा, ३ इंद्रियें जिंकणें, ४ शास्त्राभ्यास, ५ पराक्रम,

६ परिमित बोलणें, ७ यथाशक्ति दान करणें, आणि ८ परोपकार जाणणें, हे आठ उत्तम गुण ज्या पुरुषाचा राजानें सत्कार केला आहे त्यास बलात्कारें अनुसरतात तर हे राजा, कर्णादिकांच्याठायीं हे गुण दिसतात ते स्वाभाविक नव्हत, तूं त्यांचा बहुमान करतोस म्हणून भासतात मात्र.

हीं आठ स्वर्गप्राप्ति करणारीं होतः– १ यज्ञ, २ दान, ३ अध्ययन, ४ तप, ५ इंद्रियदमन, ६ सत्य, ७ धर्म, आणि ८ सरळपणा. यांतून पहिलीं चार सत्पुषास अनुसरून राहतात, आणि शेवटचीं चार साध्य होण्यास सत्पुरुषांसही यत्न करावा लागतो. धर्ममार्गाचे हे आठ प्रकार जाणावेः– १ यज्ञ, २ अध्ययन, ३ दान, ४ तप, ५ सत्य, ६ क्षमा, ७ दया, आणि ८ निर्लोभता. वडील वडील ज्या सभेंत नाहींत ती सभाच नव्हे; धर्म बोलत नाहींत ते वडीलच नव्हत; ज्यांत सत्य नाहीं तो धर्मच नव्हे; आणि ज्यांत कपटभाव आहे तें सत्यच नव्हे. या दहा गुणांचा समुदाय स्वर्गप्राप्तीला कारण होतोः– १ सत्य, २ नम्रता, ३ शास्त्राभ्यास, ४ उपासना, ५ कुलीनपणा, ६ सुस्वभाव, ७ बळ, ८ धन, ९ शूरत्व, आणि १० उचितभाषण. पातक करीत गेल्यानें अधिकाधिक पातकाचा संग्रह होतो, आणि पुण्य करीत गेल्यानें उत्तरोत्तर पुण्याचाच संग्रह होतो; यासाठीं पाप करूं नये. पाप केल्यानें बुद्धीचा भ्रंश होतो, आणि बुद्धिभ्रंश झाल्यावर पापावांचून दुसरें कांहींच सुचत नाहीं.

पुनःपुनः पुण्य केल्यानें सुबुद्धि वाढते, आणि सुबुद्धि वाढल्यानें नित्य नित्य पुण्यच हातून होतें; तस्मात् समाधानवृत्तीनें पुण्यच करीत असावें.

दोषदृष्टि, मर्मभेदक करणारा, कठोर बोलणारा, वैर लावणारा, आणि कपटी, असा जो पुरुष तो पापें करितां करितां दुःख पावून शेवटीं नरकास जातो. निर्दोषदृष्टि, ज्ञानी, व सदा उत्तम कर्म करणारा असा जो पुरुष तो दुःख न पावतां सर्वत्र शोभाच पावतो. ज्ञाते पुरुषांची संगति करून जो आपलें ज्ञान वाढवितो, तो उचित कर्म करून आपलें सुख वाढवितो. जें कर्म केल्यानें रात्रीस स्वस्थ निद्रा येईल, असें कर्म दिवसास करावें. जेणेंकरून चातुर्मास सुखानें जाईल, असें आठ महिन्यांमध्यें कर्म करावें. जेणेंकरून वृद्धापकाळ सुखानें जाईल, असें पूर्ववयामध्यें आचरण करावें; आणि ज्यापासून मेल्यानंतर सुख होईल, असें जिवंतपणीं आचरण करावें.

जिरलेलें अन्न, तारुण्य गेलेली बायको, युद्धांत पार पडलेला शूर आणि तत्त्व प्राप्त झालेला तपस्वी यांची प्रशंसा सर्व लोक करितात. अधर्मानें लाभलेल्या द्रव्यानें मनुष्य आपलें पाप झांकूं इच्छितो, परंतु तें पातक झांकलें न जातां अधिकच प्रसिद्धीला येतें. गुरु शिष्यांस शासन करितो, राजा दुष्टांस शासन करितो, आणि यम गुप्त पापें करणारांस शासन करितो. ऋषि आणि नदी यांचें कुळ, थोरांचें महात्म्य, आणि स्त्रियांचीं दुराचरणें यांचा शोध

लागत नाहीं: ब्राह्मणाची पूजा करणारा, दाता, ज्ञातीचा संतोष करणारा, आणि सदाचारानें युक्त असा जो क्षत्रिय तो पुष्कळ काळपर्यंत पृथ्वीचें पालन करितो.

पृथ्वी सुवर्णपुष्पमय आहे, तिचीं फुलें तिघे वेंचितात:-१ शूर, २ विद्वान्, आणि ३ जो सेवा करून स्वामीस प्रसन्न करायास जाणतो तो. स्वबुद्धीनें विचारपूर्वक केलेलें कर्म श्रेष्ठ होय, अंगबलानें केलेलें मध्यम, आणि कपटानें केलेलें नीच. दुर्योधन परम मूर्ख शकुनि, दुःशासन, आणि तसाच कर्ण यांजवर राज्यभार टाकून तूं ऐश्वर्य इच्छितोस तें तुला कसें प्राप्त होईल? तर आतां सर्व गुणांनीं युक्त, आणि तुला पिता असे मानणारे जे पांडव त्यांवर त्वां पुत्रांसारखी कृपा ठेवावी हें उत्तम आहे.

---

## अध्याय चवथा.

विदुर ह्मणतो, हे धृतराष्ट्रा, तुला मी या प्रसंगीं आत्रेय ऋषि आणि साध्यदेव यांचा संवाद सांगतों ऐक. कोणे एके समयीं आत्रे ऋषीस साध्यदेव पुसते झाले, हे ऋषे, तूं बुद्धिमान् आणि शास्त्रांचें तत्त्व जाणता आहेस, तर कृपा करून आह्मांस ज्ञानी पुरुषांचीं लक्षणें सांग; ह्मणजे तेणेंकरून आह्मी आपलें हित समजून सुख पावूं. ही प्रार्थना ऐकून ऋषि बोलतो, देवहो, ज्यानें सर्व इंद्रियें जिंकिलीं,

जो योगमार्ग अभ्यासून समाधिसुख घेतो, ज्यानें मनांतील मळ धुऊन अंतःकरण शुद्ध केलें, आणि जो सुख आणि दुःख समान मोजितो तो ज्ञानी जाणावा. जो दुसरा कोपानें वाईट बोलला तें सोशितो, परंतु उलटून वाईट बोलत नाहीं, आणि तेणेंकरून त्यास पश्चात्ताप उत्पन्न करून स्वयें पुण्य जोडितो; जो क्रोध टाकितो; दुसऱ्याचा अवमान करीत नाहीं; मित्रद्रोह करीत नाहीं; जो नीच सेवा, अभिमान, दुष्टस्वभाव हीं सोडितो; जो दुसऱ्याचें हृदयास, प्राणास, अथवा अस्थींस किंचितही संताप होऊं नये ह्मणून कठीण वचन बोलत नाहीं; आणि जो दुसऱ्यानें अग्नीप्रमाणें संताप देणाऱ्या वाग्बाणांनीं ताडिलें असतांही विचार करितो कीं, हा जर मला वाईट न बोलता तर मी क्षमा कोणास केली असती? आणि क्षमा केली नसती तर पुण्य असें जोडलें असतें? असा विचार करून निंदकाचा उपकार मानणाऱ्या पुरुषास ज्ञानाचें सार समजलें असें समजावें.

ज्याप्रमाणें धुतलेलें शुभ्र वस्त्र ज्या रंगांत घालावें तो रंग घेऊन उठतें, त्याप्रमाणें मनुष्यानें सहवास करावा तसा त्यास गुण प्राप्त होतो. तो साधूचे संगानें साधु होतो, मूर्खाचे संगानें मूर्ख होतो, आणि चोराचे संगानें चोर होतो. जो स्वयें कोणास छळीत नाहीं, व दुसऱ्याचें हातून छळ करवीत नाहीं, आपल्यास उपद्रव झाला असतांही जो दुसऱ्यास नाडायाची इच्छा करीत नाहीं, मग न झाल्यास नाडीत नाहीं ह्मणून काय सांगावें! अशा पुरुषाच्या संगतीची दे-

वही वांछा करितात. . मुकें रहावें त्यापेक्षां सत्य बोलावें हें बरें; सत्य असून प्रिय बोलावें हें त्याहून अधिक; आणि सत्य व प्रिय असून धर्मयुक्त बोलावें तें सर्वोत्कृष्ट. जो ज्या पुरुषांबरोबर बसतो उठतो, ज्या पुरुषांची संगती करितो, आणि जशी स्थिति धरावयास इच्छितो, तसा तो होतो. ज्या ज्या दुःखदायक गोष्टींपासून मनुष्य सुटावयास इच्छील, त्यां त्यांपासून तो सुटेल. जो सर्व प्रपंच सोडील त्याला काडीमात्रही दुःख होणार नाहीं. तो जें जें साधील तें तें त्याला साधेल. पुरुषांस असाध्य, असें कांहींच नाहीं. याप्रकारें आत्रेयऋषि साध्यदेवांशीं बोलून तपोवनास जाता झाला. एथें व्यापार करा ह्याप्रमाणें सांगून विदुर बोलतो हे धृतराष्ट्रा. जो पुरुष अनीतीनें कोणास जिंकीत नाहीं. व दुसऱ्याचे हातून जिंकिला जात नाहीं. कोणाशीं वैर करीत नाहीं. निंदा आणि स्तुति समान मानितो, हर्ष शोक करीत नाहीं. प्राणिमात्रानें सुखी असावें असें इच्छितो, सत्य भाषण करितो, ज्याची मवाळ प्रकृति, आणि ज्याचीं इंद्रियें स्वाधीन अशा मनुष्यास उत्तम पुरुष ह्मणतात. जो गोड बोलून उगाच भरंवसा देत नाहीं. देईन असें मुखांतून निघाल्यास देतो; आणि दुसऱ्याचे छिद्रांचा शोध ठेवितो, अशा मनुष्यांस मध्यम पुरुष ह्मणतात. जो उपकार कर्त्यास अपकार करितो. जो केवळ दुराचरणी. ज्याचें कोणाशींच इष्टत्व नाहीं. जो दुसऱ्यानें बरी गोष्ट सांगितलेली ऐकत नाहीं; आणि जो मित्रास ठकवितो तो अधम पुरुष

जाणावा. जो आपलें बरें इच्छितो त्यानें उत्तमाची संगति करावी, प्रसंग पाहून मध्यमाचीही करावी, परंतु नीचाची कधींही करूं नये.

जो लोकांची वंचना करून सर्वदा धन संग्रह करितो, आणि आपण थोर, शहाणा, व पराक्रमी असें मानितो, अशा मनुष्यास लोकांत थोरपणा नाहीं; आणि तो थोर कुळांतला जरी आहे तरी त्या कुळाचें योग्यतेस पावत नाहीं. धृतराष्ट्र पुसतो, विदुरा, मी थोरकुळाचें माहात्म्य फार ऐकतों. त्यांत जन्म व्हावा अशी देवही वांछा करितात. मग इतर करितील ह्यांत नवल काय! तर कृपाकरून थोर कुळांचीं लक्षणें सांग. त्यावेळेस विदुर त्यास सांगतो:—१ तप, २ इंद्रियांचा जय, ३ वेदशास्त्राध्ययन, ४ यज्ञ, ५ पुण्यकर्म, ६ विवाहादिक उत्साह, आणि ७ निरंतर अन्नदान हे सात गुण जेथें उत्तमप्रकारें राहतात तीं थोर कुळें ह्मणावीं. ज्यामध्यें दुराचरण नाहीं, आईबाप दुःख न पावतां नित्य संतुष्ट राहतात, धर्माचरण करण्याचा उत्साह फार, आपल्या कुळाची सत्कीर्ति व्हावी अशी सर्वांस इच्छा, आणि ज्यांत असत्य ह्मणून राहत नाहीं, तीं महा कुळें जाणवीं. ज्यामध्यें यज्ञादिक कर्में होत नाहींत, विकल्प घेऊन वेदांची निंदा करितात, ब्राह्मणांस अमर्यादा, ताडण, निंदा हीं सोसावीं लागतात, ज्यांत ठेवावयास दिलेल्या वस्तूंचा अपहार होतो, आणि जीं सदाचरणहीन, तीं असत्कुळें जाणावीं. वक्तृत्वानें, विद्येनें, रूपवान् मनुष्यांनीं, अथवा पुष्कळ द्र-

व्यानें उत्तम कुळ होत नाहीं. ज्या कुळांत उत्तम आचरण आहे, तेथें थोडकेंही धन असलें तथापि तें थोर कुळ होय, आणि त्याची कीर्तिही मोठी असते; ह्मणून यत्नें करून नित्य सदाचरण करीत असावें. द्रव्य येतें जातें; द्रव्यानें हीन झाला, तों हीन नव्हे, परंतु सदाचरणानें जो हीन. तो मात्र हीन ह्मणावा. सदाचरणहीन जीं कुळें तीं विद्येनें, गोधनानें, अश्वादिकांनीं, अथवा मोठ्या शेतीनें उंच होत नाहींत. राजा, आमच्या कुळामध्यें वैर करणारा कोणी नसो. आमचे कुळांतील राजा, प्रधान, अथवा आणखी कोणी सत्ताबळानें दुसऱ्याचें द्रव्य हरण न करो. आमच्या कुळांत मित्रद्रोह करणारा, कृत्रिमी, असत्य बोलणारा, आणि देव, पितर, व अतिथी यांस दिल्याचे पूर्वीं भक्षण करणारा हे नसोत; कारण हे कुळघातकी होत. जो ब्राह्मणांचा घात करितो, ब्राह्मणांचा द्वेष करितो, आणि वडिलांचें संरक्षण करीत नाहीं, तो आमचे कुळांत नसो.

कोणी घरीं आला तर त्यास १ बसायास पाट अथवा जागा, २ पिण्यास पाणि, आणि ३ गोड भाषण, हीं तीन साधूंचे घरीं नित्य मिळतात. याप्रकारें घरीं आलेल्याचा सत्कार केला असतां तो पुण्यकर्म करणाऱ्या भक्तिमान् पुरुषांचा मान वाढवितो. ज्याप्रमाणें लहान रथ जितका भार साहतो, तितका भार दुसऱ्याच्यानें घेववत नाहीं, त्याप्रमाणें थोर कुळींचे पुरुष. जसा लोकांचा भार साहतात,

आणि लोकांचें दुःख आपण घेऊन त्यांस सुखी करितात, तसें कर्म इतर मनुष्यांच्यानें होत नाहीं.

जो पुरुष मित्रास राग येईल ह्मणून भितो, अथवा मित्राशीं बोलायास शंका धरितो, त्याचें मित्रत्व आहे असें ह्मणूं नये; तर जो मित्रावर बापासारखा विश्वास ठेऊन वागतो त्याचें नांव मित्र; इतर लोक मात्र ओळखीचे; मित्र नव्हत. जो नम्रतेनें आपणाशीं भाषण करितो, आणि सर्वदा आपलें हित इच्छितो, तोच आपला मित्र आणि बंधु असें जाणावें; तो परका ह्मणूं नये. जो चंचळबुद्धीचा आणि आपले वडिलांचा मान न राखणारा, त्याशीं स्नेह फार दिवस राहणार नाहीं. ज्याप्रमाणें कोरड्या तळ्यास पक्षी शिवत नाहींत, जवळ मात्र राहतात, त्याप्रमाणें जो चित्ताचा चंचळ, मनाचा कपटी, आणि इंद्रियांचा अंकित, त्यास जरी दैवयोगानें सर्व अर्थ प्राप्त झाले तथापि ते त्यास शिवत नाहींत, ह्मणजे सुखदायक होत नाहींत. कारणांवांचून अकस्मात् कोप करावा, अथवा अकस्मात् प्रसन्न व्हावें, हा हलक्या मनुष्यांचा स्वभाव. त्याप्रमाणें ज्या मित्रानें पूर्वीं आपणावर उपकार केले आहेत अथवा जो संकटीं कामास पडला आहे, त्या मित्रास आपणही समयीं उपयोगीं पडलें पाहिजे आणि असा ज्या मित्राचा स्वभाव असेल तोच मित्र ह्मणावा. जो पुरुष आपल्यावर उपकारकर्त्या मित्राच्या उपयोगीं पडत नाहीं, तो मरून कदाचित् गिधांचे हातीं पडला असतां, तेही तो कृतघ्न असें जाणून त्याचे मांसास

स्पर्श करीत नाहींत; म्हणून आपले जवळ द्रव्य असो अथवा नसो. परंतु आपल्या सामर्थ्याप्रमाणें मित्रानें सांगितल्यावांचूनही त्याचे उपयोगीं पडावें; ज्याप्रमाणें हात प्रार्थिल्यावांचून आपले मित्र जे शरीर त्यास राखितात, आणि पापण्या डोळ्यांस राखितात.

आपणास कधींही संताप होऊं देऊं नये; कारण संतापापासून रूप, बल, व ज्ञान,- यांचा नाश, आणि रोगप्राप्ति हीं होतात. जे प्राप्त व्हावयाचें नाहीं तें शोक अथवा संताप केल्यानेंही प्राप्त होत नाहीं; परंतु आपला शोक अथवा संताप ऐकून आपले शत्रूंस आनंद मात्र होतो. मनुष्य पुनः पुनः होतो, मरतो; लहान होतो, वाढतो; मागतो मागवितो; आणि शोक करितो, व करवितो. सुख, दुःख, जन्म, मरण, लाभ, हानि, हीं एकामागें एक मनुष्यमात्रास होत आहेत; तस्मात् धैर्यवानानें यांचा हर्ष किंवा शोक करूं नये.

एवढें ऐकून धृतराष्ट्र बोलला, विदुरा, व्रतें, उपवास, इत्यादि करून कृश झाला असतांही तेजःपुंज असा पुण्यात्मा जो धर्मराजा, त्यास मी कपटें करून छळिलें; तो आतां युद्ध करून माझ्या पुत्रांचा घात करील. तूं पुष्कळ उपदेश केलास तथापि माझें उद्विग्न झालेलें चित्त शांत होत नाहीं; तर जेणेंकरून मी समाधान पावेन असें कांहीं सांग. तें ऐकून विदुर त्यास ह्मणतो, अध्ययनानें प्राप्त झालेली विद्या, इंद्रियनिग्रह, आणि लोभाचा त्याग, यांवांचून तुझी शांति होणार नाहीं. मन शांत केल्यानें दुःख दूर होतें, तपानें सद्गुरु

लाभतो, गुरुसेवेनें ज्ञान प्राप्त होतें. सर्व चित्तवृत्ति वेदावर ठेविल्यानें शांति प्राप्त होते, आणि शांति प्राप्त झाली असतां देहादिक इहलौकिक पदार्थ सर्व तुच्छ वाटतात; मग राज्यावर आसक्ति राहणार नाहीं; हें काय सांगावयाचें! मोक्षाविषयीं यत्न करणार जे पुरुष ते परोपकारार्थच दानें करितात, आणि ज्ञानप्राप्ति व्हावी ह्मणूनच वेदशास्त्राध्ययन करितात. या दोहों कर्मांच्या पुण्यापासून स्वर्गादिक प्राप्ति इच्छिणें तुच्छ असें समजून ते ती इच्छीत नाहींत; आणि इहलौकिक पदार्थांवर प्रीति किंवा अप्रीति हीं दोन्हीं न करितां ते मोक्षप्राप्तीची योग्यता येईपर्यंत पुनः पुनः जन्म घेऊन मृत्युलोकींच संचार करितात.

संसारापासून सुखाची इच्छा करणार जे त्यांस मऊ आंथरुणावर झोंप येत नाहीं. स्त्रियांपासून सुख होत नाहीं. विश्रांति मिळत नाहीं. त्यांस मोटेपणा नाहीं. शांति नाहीं. आणि त्यांस स्वहितही समजत नाहीं. योग ह्मणजे अप्राप्त वस्तूचा लाभ. आणि क्षेम ह्मणजे प्राप्त वस्तूचें रक्षण. तो योगक्षेम त्यांस होत नाहीं. विशेष काय सांगावें? जी गोष्ट बरी ती त्यांस वाईट दिसते; आणि ज्या गोष्टीपासून आपलें वाईट होणार ती त्यांस बरी वाटते. ज्याप्रमाणें गायीचेठायीं दूध, ब्राह्मणांचेठायीं तप, आणि स्त्रीचेठायीं चपळ बुद्धि हीं असतात, त्याप्रमाणेंच ज्ञानी पुरुषाचे ठायीं निर्भयपणा नित्य असतो. तर हे राजा, जे तुझे कुळाचे तंतू, आणि ज्यांस तूं पुष्कळ वर्षे पाळिलेंस, ते पांडव तुझ्या पुत्रांपासून

वनवासादिक पुष्कळ दुःखें भोगीत आहेत. लोकांमध्यें साधूस उपमा देणें झाली तर ह्मणतात कीं, हा पांडवांसारिखा साधु आहे. तुझे पुत्र पांडवांसारिखे नाहींत. जशीं पेटलेलीं लांकडें वेगळीं केलीं असतां धूर करून त्रास देतात, आणि एकत्र केलीं तर पेटून संताप करितात, तसे तुझे पुत्र होत. ह्मणून तूं पांडवांवरे प्रीति करून ज्ञानी पुरुषांसारखा निर्भय हो.

१ ब्राह्मण, २ स्त्री, ३ ज्ञाति, आणि ४ माय, यांजवर जे पराक्रम करितात, ते फळ पिकलें ह्मणजे जसें झाडावरून खालीं पडतें, तसें त्यांचें पाप भरलें ह्मणजे नाश पावतात. जमिनींत लांबवर मूळें गेलेला असा मोठा बळकटही वृक्ष एकटाच असला तर त्यास मोठा वारा पाडितो; परंतु जे वृक्ष एकमेकांच्या आश्रयानें एकत्र असतात, ते मोठ्याही वाऱ्याचा उपद्रव साहूं शकतात. ह्यावरून एकटा पुरुष मोठा बलवान् व शाहणा असला तथापि तो एकट्या वृक्षासारखा शत्रूपासून नाश पावतो. जशीं जलांत कमळें वाढतात, तशी एकमेकांचा आश्रय धरून ज्ञाति वाढते, ब्राह्मण, गायी, ज्ञाती, बाळकें, स्त्रिया यांस, तसेंच ज्यांचें अन्न खालें त्यांस, अथवा शरण आलेल्यांस मारणें योग्य नव्हे. हे राजा, सधनपणा आणि निरोगीपणा हीं दोन या लोकीं सुखाचीं कारणें होत; रोगी जे आहेत ते मेल्यामध्यें मोजावे, त्यांस धन असून काय उपयोग? तुला हीं दोन्हीं अनुकूळ असून रोगीसा दिसतोस; हा क्रोधरूपी रोग तुला पांडवांमुळें प्राप्त झाला आहे, यास दुसरें कांहीं निमित्त दिसत नाहीं.

जो फार कडू, जो फार कठोर, आणि विखट, ज्यास साधू मात्र गिळून टाकितात, आणि ज्यापासून तुझे मस्तकांत भ्रम शिरला आहे, अशा क्रोधास तूं गिळून टाकशील तरच सुखी होशील; याशिवाय दुसरा उपाय नाहीं.

रोगानें पीडिलेल्या मनुष्यांस पुत्र, पौत्र, विषयभोग, धन, यांपासून सौख्य होत नाहीं. रोगी नित्य दुःखी असतो. थोर पुरुष कपटविद्येचा आश्रय करीत नाहींत. जो आपण केलेलें सहन करितो त्याजवर पराक्रम करणें योग्य नव्हे, आणि अशावरही क्रूर होऊन जो लक्ष्मी मिळवितो त्याची लक्ष्मी स्थिर रहात नाहीं; पण धर्मानें मिळविलेली मात्र चिरकाल रहते.

हे धृतराष्ट्रा, मी तुला सार गोष्ट सांगतो! तुझे पुत्र पांडवांचें रक्षण करोत, आणि पांडव तुझ्या पुत्रांस रक्षोत. यांचे शत्रुमित्र ते त्यांचे, आणि त्यांचे ते यांचे; यांचें कार्य तें त्यांचें, आणि त्यांचें तें यांचें; असा भाव परस्परांच्या मनांत राहून ते सुखी नांदोत. तूं राजा आज कौरवांमध्यें मुख्य आहेस, आणि तुझे स्वाधीन सर्व आहेत. तर पांडवांस हातीं धरून आपली कीर्ति रक्षण कर. कौरवपांडवांचें ऐक्य कर; तुह्मांमध्यें फूट करावयास इच्छितात ते शत्रु असें जाणून त्यांचे पाय मोड; पांडव सत्यधर्मानें चालत आहेत ह्मणून जय पावतील हें निःसंशय जाणून तूं दुर्योधनास युद्ध करण्याचे भरीस घालूं नको. यांत मला तुझें कल्याण दिसतें.

# अध्याय पांचवा.

विदुर ह्मणतो, हे धृतराष्ट्रा, पूर्वीं स्वायंभूव मनूनें मूर्खांचीं सतरा लक्षणें सांगितलीं आहेत तीं मी तुला सांगतों. हे, सतराजण आकाश बुक्या मारून फोडावयास इच्छिणारे, अथवा आकाशांत इंद्राचें धनुष्य मोडूं पाहणारे, अथवा चंद्रसूर्यांचीं किरणें मुठींत धरूं लागणारे, अशीं अशीं न व्हावयाचीं तीं कर्मे करण्यास धजणाऱ्या अत्यंत मूर्खांपैकीं मूर्ख समजावे:—१ कुशिष्यास उपदेश करून गुरूपणा इच्छितो तो, २ थोडा लाभ झाला ह्मणून रुसतो तो, ३ शत्रूची सेवा करून कल्याण इच्छितो तो, ४ द्वाड स्त्रीची चौकशी राखून तिजपासून बरें इच्छितो तो, ५ मागूं नये तें मागतो तो, ६ थोडें करून मोठी प्रतिष्ठा सांगतो तो, ७ अनुचित काम करून कुलीनपणा इच्छितो तो, ८ विश्वासास योग्य नव्हे त्याजवळ विश्वासानें बोलतो तो, ९ निर्बळ असून बळवानाशीं नित्य वैर करितो तो, १० न इच्छावी ती वस्तु इच्छितो तो, ११ लेंकीशीं बाप हास्य विनोद करीत असतां ज्या सासऱ्यास क्रोध येतो तो, १२ सुनेच्या बापाचे कुटुंबापासून आपली उपजीविका चालत असतां तिकडून मान इच्छितो तो, १३ परस्त्रीशीं रत होऊन निर्भयता इच्छितो तो, १४ आपले स्त्रीशीं अमर्याद भाषण करून दादलेपणाचा मान इच्छितो तो, १५ आपणाकडून कांहीं गोष्ट

ाली ती ज्यास पक्की ठाऊक आहे, त्यास भ्रांतींत घाला-
ास इच्छितो तो, १६ तीर्थी ज्यास वांचादत्त केलें तो
ाचक घरीं मागायास आला असतां त्यास तें न देतां त्या
ीर्थी पुष्कळ दान केल्याच्या गोष्टी सांगतो तो आणि १७
ुष्टास साधुपणाचा उपदेश करितो तो. जो जसा आप-
ाशीं वर्ततो तसें आपण त्याशीं वर्तावें; कपट्याशीं कपटी
व्हावें, आणि भल्याशीं भलें व्हावें. हे धृतराष्ट्रा, तुला मी
एकवेळ पूर्वी सांगितलेंच आहे; आणखी पुनःही सांगतों कीं,
केवळ अभिमानासाठींच अभिमान धरिल्यानें धन संपत्ति
आणि प्राण यास सर्वस्वीं मुकावें लागतें. सर्व वेदशास्त्रांचे-
ठायीं मनुष्यप्राण्यांस शंभर वर्षे आयुष्य सांगितलें आहे,
असें असून ते त्या पूर्वींच कां मरतात ? असा धृतराष्ट्राचा
प्रश्न ऐकून विदुर त्याचीं कारणें सांगतोः—१ थोरास तुच्छ
करून बोलणें, २ सर्वांहून आपली आढ्यता मिरवणें, ३
द्यावयास योग्य तें न देणें, ४ कारणावांचून क्रोध करणें,
५ दुसऱ्याचे उपयोगीं न पडतां शरीरास सुख होईल तें तें
मात्र करणें, आणि ६ मित्राशीं द्रोह करणें; हे महा दुर्गुण
तिखट तरवारी होऊन प्राण्यांचें आयुष्य तोडितात. "मृत्यु
तोडित नाहीं. १ जो विश्वासानें जवळ आल्या त्याचे स्त्री-
पाशीं जातो तो, २ जो गुरूचे स्त्रीशीं जातो तो, ३ ब्राह्मण,
क्षत्रिय, वैश्य, या तिहीं पैकीं एका वर्णाचा असून शूद्रस्त्रीशीं
जातो तो, ४ मद्यपी, ५ वडिलांस आज्ञा करितो तो, ६
दुसऱ्याचे उपजीविकेचा उच्छेद करितो तो, ७ वेदशास्त्रसं-

पत्र ब्राह्मणास चाकराचें काम सांगतो तो, आणि ८ शरणागतास मारितो तो; हे आठ ब्रह्महत्या करणाराच्या तोडीचे आणि आयुष्याचा घात करणारे होत. यांचा संसर्ग झाला असतां प्रायश्चित्त करावें. गुरुचें वाक्य पाळणारा, न्याय व अन्याय जाणून वर्तणारा, दाता, देवब्राह्मणांस देऊन जेवणारा, हिंसा न करणारा, अनर्थकारक कर्म न करणारा, उपकारांस प्रत्युपकार करणारा, आणि सत्य व मवाळ बोलणारा असा पुरुष स्वर्गी जातो. हे राजा, निरंतर गोड बोलणारे पुष्कळ मिळतील, परंतु कडू बोलून आपल्या बऱ्याची गोष्ट सांगणारा आणि ऐकणारा हे दोन्ही दुर्लभ. राजास गोड वाटो अथवा कडू वाटो, परंतु जो त्याचें कल्याण इच्छून नीतीचें सांगतो तो सहाय ह्मणावा; आणि असे लोक जवळ असतील तर ह्मणावें कीं, तो राजा सहाययुक्त ह्मणजे सबळ आहे; नाहीतर इतर पोटार्थी जवळ असून फळ काय? कुळांत एक पुरुष वाईट आहे त्यास सोडिल्यानें कुळाचें रक्षण होत असल्यास त्यास टाकावें; गांवाचे रक्षणासाठीं एक कुळ टाकावें; देशाचे रक्षणासाठीं एक गांव टाकावा; आणि आपले रक्षणासाठीं सर्व पृथ्वीचें राज्य टाकावें. संकटकाळीं उपयोगास पडेल ह्मणून धनाचें रक्षण करावें; स्त्रीपुत्रांचें रक्षणार्थ धनाचा व्यय करावा; आणि धन व स्त्रीपुत्रादिक सर्व जाऊन आपलें रक्षण होत आहे असें असल्यास तसें करून आपलें रक्षण करावें. कारण शरीर राहिलें तर आपलें सार्थक करितां येईल.

हे धृतराष्ट्रा, द्यूत हें वैर उत्पन्न करणारें होय, यास्तव भल्यानें कर्मणूकेसाठींही खेळूं नये. हें द्यूत चांगलें नव्हे असें तुला मीं खेळावयास लागण्याच्या आरंभींच सांगितलें होतें, परंतु जसें रोग्यास मरण जवळ आलें असतां गुणकारी औषध रुचत नाहीं, तसें तुला माझें बोलणें त्या वेळेस रुचलें नाहीं; ह्मणून आज चिंतेस पात्र झालास. सर्वदा आपलें हितच करणाऱ्या सेवकांस जो सोडीत नाहीं, त्यास आपत्काळीं सेवकही सोडीत नाहींत. एक वेळ सेवकांस दिलेली उपजीविका जो उणी करितो अथवा चालवीत नाहीं, त्यास ते ठक असा मानून त्याचें अनहित होईल तें करितात; ह्मणून पूर्वींच आपला आदा व खर्च पाहून त्यांस देण्याचें तें एकदां ठरवून टाकावें. आपल्यास अनकूळ असणार, आणि आपलें कार्य तिडकेनें करणार जे असतील त्यांस जवळ बाळगावें. कारण एखादें महा दुर्घट काम असलें तरी तें त्यांच्या साह्यानें साध्य होतें. जो सेवक धन्याचें मनोगत समजून सर्व कार्यें आळस न करितां प्रामाणिकपणें करितो, हितवाद सांगतो, आणि धन्याची शक्ति जाणतो अशास आपल्या जिवाप्रमाणें बाळगावें. जो सेवक सांगितलेलें काम ऐकत नाहीं, उन्मत्तपणानें मी करीत नाहीं असें स्पष्ट बोलतो, आणि आपण धन्यापेक्षां शहाणे आहों असें दर्शवून त्याचें बोलणें मोडतो अशा सेवकास सत्वर काढून टाकावें. जो १ निगर्वी, २ धारिष्टवान् ३ सांगितलेलें काम लवकर करणारा, ४ दयाळू, ५ मृदुभाषी, ६ धन्यास सां-

हून दुसऱ्यास कधींहीं वश न होणारा, ७ जिव्हा स्वाधीन ठेवणारा, आणि ८ समयीं सुयुक्त बोलणारा असा आठ गुणांनीं युक्त जो सेवक तो उत्तम ह्मणावा. ज्याचा आपल्यास विश्वास नाहीं, त्याचे घरीं रात्रीस कधीं जाऊं नये. रात्रीस कोणाचे अंगणांत नकळत राहूं नये. राजानें इच्छिलेल्या स्त्रीची इच्छा करूं नये, आपल्या बरोबर पुष्कळ जणांनीं मिळून एखादी गुजगोष्ट केली, आणि ती आपणास रुचली नाहीं असें त्यांस स्पष्ट न दाखवितां आपण कांहीं निमित्त करून त्यांतून निसटून जावें.

इतक्यांशीं द्रव्याचा व्यवहार करूं नयेः–१ द्यावयास न इच्छील तर देणार नाहीं ह्मणून राजाशीं, २ आपलें व तिचें एकचित्त आहे असें लोकांस वाटेल ह्मणून व्यभिचारिणी स्त्रीशीं, ३ राजास आपला ह्मणून अभिमान पडेल यासाठीं राजसेवकाशीं, ४ परत घेण्याविषयीं बलात्कार करणार नाहीं ह्मणून पुत्रांशीं अथवा बंधूशीं, ५ जिचा पुत्र लहान आहे, आणि स्वतां विधवा आहे अशा स्त्रीशीं, आणि ६ कांहीं दूषणामुळें राजानें ज्याच्याकडून कारभार काढला आहे त्याशीं. कारण अशा पुरुषावर फिर्याद केली असतां आपणासच दोष लावील. प्रातःस्नान करणाराचे ठायीं हे दहा गुण राहतातः १ बळ, २ रूप, ३ सुस्वरता, ४ स्पष्टवर्णोच्चार, ५ मवाळपणा, ६ सुगंधता, ७ निर्मळता, ८ शोभा, ९ सुकुमारता, आणि १० वा सर्व गुणांस्तव उत्तम स्त्री प्राप्ति. भूक ठेवून जेवणाराचे ठायीं हे सहा गुण राह-

तातः—१ आरोग्य, २ आयुष्य, ३ बळ, ४ सुख, ५ चांगलें आपत्य, आणि ६ अधाशी ह्मणून लोक निंदित नाहींत तो. आपल्या भुकेचे चार भाग करून दोन भाग अन्न भक्षावें. एक भाग पाणि प्यावें आणि चौथा भाग वायुसंचारासाठीं रिकामा ठेवावा. याचें नांव मित भोजन. यांत अन्यथा झाल्यास रोगास कारण होतें. हे सात पुरुष घरांत ठेवूं नयेतः—१ अकर्मी, २ खादाड, ३ द्वेषी, ४ महापातकी, ५ घातकी, ६ समयानुसार वर्तणूक न जाणणारा, आणि ७ नाना प्रकारचे वेष धरणारा. या नवांपाशीं संकटकाळींही याचना करूं नयेः—१ अदाता, २ गाळी देणारा, ३ मूर्ख, ४ रानटी, ५ कपटी, ६ नीचाची संगत करणारा, ७ निर्दय, ८ हाडवैरी, आणि ९ कृतघ्न. ह्या सहा निचांशीं कधींही गांठ पडूं देऊं नयेः—१ कुकर्मी, २ व्यग्रचित्त, ३ सदा लबाड, ४ ज्याचें स्नेहाकडे लक्ष नाहीं असा; ५ चंचळवृत्ति, आणि ६ आपणच शहाणा असें मानणारा. दुसऱ्याचे साहित्यावांचून द्रव्यादिक अर्थ प्राप्त होत नाहींत तसेंच द्रव्यादिक अर्थावांचून दुसऱ्याचें साहित्य प्राप्त होत नाहीं. या दोहोंस एकमेकांची अपेक्षा असल्यामुळें एकावांचून एक सिद्ध होत नाहीं. या लोकीं जन्म घेऊन पुरुषानें काय करावें तें सांगतोः—स्वस्त्रीपासून पुत्र उत्पन्न करावे, त्यांजकडून विद्याभ्यास करवावा, ऋण न करितां त्यांस कांहीं उपजीविकेचें साधन करून द्यावें, कन्या असतील तर त्या चांगले स्थळीं द्याव्या, आणि नंतर संसार पुत्रांचे स्वाधीन करून

आपण अरण्यांत अथवा दुसऱ्या एकास्थळीं राहून निरंतर परमेश्वरभजनीं लागावें. तें भजन कसें ह्मणशील तर, ज्यामध्यें प्राणिमात्राचें हित होईल, व जें केल्यानें आपल्या आत्म्यास सुख होईल. त्यापासून शरीरास कष्ट पडले तरी चिंता नाहीं, तें कर्म केवळ परमेश्वरप्रीत्यर्थ करावें; ह्मणजे त्यापासून आपणास अमुक फळ प्राप्त व्हावें ह्मणून करूं नये. असें जें तेंच परमेश्वराचें भजन आणि सर्व सिद्धीचें मूळ होय. १ दुसऱ्यास मित्र करून घेण्याची बुद्धि, २ स्वयें निर्दोष ह्मणून शत्रूवर दाब, ३ सत्यादि गुणेंकरून तेज, ४ बळ, ५ उद्योग, आणि ६ निश्चय हीं सहा ज्यास आहेत त्यास पोटाची काळजी नाहीं.

विदुर ह्मणतो, हे राजा, तूं आपले घरांत कलह करून इतक्या गोष्टि पदरांत घेतल्यासः देवाची अवकृपा, आपलीं लेकरें व पांडव त्यांशीं वैर, आपल्यास नित्य चिंता, लोकांत अपकीर्ति, आणि शत्रूंस हर्ष. भीष्माचा कोप, तुझा कोप, द्रोणाचा कोप व धर्मराजाचा कोप हे चार थोरांचे कोप वाढले असतां सर्व लोकाचा विध्वंस करूं शकतील; तर असें न होईल तें तूं कर. तुझे शंभर पुत्र, कर्ण, आणि पांच पांडव, हे एक चित्तानें संपूर्ण समुद्रवलयांकित पृथ्वीचें पालन करोत. तुझे पुत्र हे वन होत, आणि पांडव हे व्याघ्र होत; तस्मात् व्याघ्रांसहित वनाचा छेद करूं नको. पांडवरूप व्याघ्रांवांचून तुझे पुत्ररूप वनाचा नाश होणार ! तो न होवो; कारण व्याघ्रांवांचून वन नाहीं आणि वनावांचून

व्याघ्र नाहींत. व्याघ्रांची वस्ती आहे ह्मणून वन सुरक्षित आहे, आणि वनामुळें व्याघ्र सुरक्षित आहेत.

दुष्टबुद्धीचे पुरुष दुसऱ्याचे सद्गुण जाणूं इच्छीत नाहींत, दोषांचा मात्र शोध ठेवितात; आणि सद्गुणांवर दाटून दोषारोप करितात. उत्कृष्ट पुरुषार्थ इच्छिणारानें आधीं स्वधर्म आचरावा. स्वर्गलोकास सोडून जसें अमृत नाहीं, तशीं स्वधर्मास सोडून कोणतीही अर्थप्राप्ति नाहीं; ज्याचें चित्त पातकास कंटाळून ईश्वराकडे लागलें त्यानें सर्व कांहीं जाणिलें. धर्म, अर्थ, काम हे जसे सेवावे तसे ज्यानें सेविले, त्यास त्यांचें फळ या लोकीं आणि परलोकीं मिळालें. क्रोध व हर्ष यांचा वेग जो साहतो, ह्मणजे त्यांपासून विकार पावत नाहीं, आणि आपत्तिकाळीं जो घाबरत नाहीं, तो लक्ष्मीचा कृपापात्र होतो. पुरुषास बळ पांच प्रकारचें आहे:— त्यांत १ बाहुबळ, २ विचारदेणारांचें बळ, ३ धनबळ, ४ आप्तांचें बळ, आणि ५ बुद्धिबळ. या सर्वांमध्यें बुद्धिबळ श्रेष्ठ होय. मोठा अपकार करूं शकणाऱ्या पुरुषाशीं वैर करून, ज्यापासून आपण दूर आहों त्यापेक्षां आपणांस उपद्रव होणार नाहीं असा विश्वास धरूं नये. १ स्त्री, २ राजा, ३ सर्प, ४ अध्ययन, ५ आपला धनी, ६ शत्रु, ७ विषयभोग, आणि ८ आयुष्य हीं माझींच आहेत असें ह्मणून शहाण्यानें यांचा कधींही भरंवसा धरूं नये. बुद्धीत विकार झालेल्याची परीक्षा करायास वैद्य आहे, परंतु औषध नाहीं. तेथें मंत्र, तंत्र, होम यांचाही उपाय चालावयाचा

नाहीं. १ सिंह, २ सर्प, ३ अग्नि, आणि ४ आपली ज्ञाति यांची अवगणना करूं नये; कारण हे अति तेजस्वी होत. महा तेजोरूपी अग्नि काष्टाचे ठायीं गुप्त आहे तोंपर्यंत कांहीं वाटत नाहीं, परंतु तोच काष्टघर्षणानें प्रकट झाल्यावर त्या काष्टासुद्धां सर्व वन जाळितो. तसेंच आपले कुळाचे ठायीं पांडव अग्नीसारखे तेजस्वी आहेत, परंतु ते क्षमावंत ह्मणून आपलें सामर्थ्य न समजूं देतां काष्टांतल्या अग्नीसारखे राहिले आहेत.

हे राजा, तूं आपल्या पुत्रांसहित वेलीरूप होस, आणि पांडव हे मोठे वृक्ष होत; आणि वेली तर मोटचा वृक्षाच्या आश्रयावांचून वाढत नाहींत. तुझे दुर्योधनादिक पुत्र हे वन होय, आणि या वनांत पांडव हे सिंह होत, असें समज. भ्रमांत पडूं नको; सिंहांवांचून वन नाश पावेल, आणि बनावांचून सिंह नाश पावतील; ह्मणून त्यांतून कोणाचाही क्षय होऊं नये हें मला बरें दिसतें.

---

## अध्याय सहावा.

हे राजा, कोणीही पाहुणा आपले घरीं आला असतां त्यास बसायास द्यावें; पाय धुवावयाचे योग्यतेचा असल्यास त्याचे आपण पाय धुवावे; नाहीं तर पाणी आणून द्यावें; आणि कांहीं उपहारास द्यावें नंतर त्याचें वर्तमान पुसावें;

त्यानें पुशिलें असतां आपलें सांगावें; आणि मग त्यास सत्कारपूर्वक भोजन घालावें. आपले घरीं आलेल्याचा जो सत्कार करीत नाहीं, आणि लोभास्तव अथवा कृपणपणानें त्यास कांहीं देत नाहीं त्याचें जिणें व्यर्थ. शास्त्र न पढतां स्वकल्पनेनें औषध देणारा, हातेरें करणारा, शिनळ, चोर, क्रूर, दारूबाज, गर्भ पाडणारा, धंडावर पोट भरणारा, आणि वेद विकणारा हे उदक खावयासही योग्य नव्हत; परंतु ते जेवणाच्या वेळेस आपले दारीं आले असतां त्यांचा जांवयासारखा सत्कार करून त्यांस भोजनास घालावें.

बुद्धिमानाचें वाईट करून मी त्यापासून दूर आहें असें ह्मणूं नये. कारण त्याचे हात लांब असतात. विश्वास धरायास योग्य नाहीं अशाचा विश्वास धरूं नये; आणि विश्वास धरावयास योग्य अशावरही फार विश्वास ठेवूं नये. कारण प्रसंगवशात् तो वैरी झाला असतां त्यास आपलीं सर्व वर्में ठाऊक होतील, आणि त्याचे हातून आपला समूळ नाश होईल. स्त्री ही घरांतील लक्ष्मी होय; निजविषयीं क्षमा असूं द्यावी; तिचें संरक्षण करावें; तिला अन्नवस्त्रादिक यथायोग्य द्यावें आणि तिशीं मधुर बोलावें; परंतु तिचे स्वाधीन मात्र होऊं नये. बापाकडे घरच्या स्त्रियांची चौकशी सांगावी; आईस स्वयंपाकघराचा बंदोबस्त सांगावा; आपले बरोबरीचे भाऊबंद यांस पशूंची चौकशी सांगावी; पुत्राचे हातून ब्राह्मणसेवा करवावी; आणि शेत अथवा दुकान आपण स्वयें सांभाळावें.

ज्या राजाचें गुज जवळच्या किंवा दूरच्या कोणालाही समजत नाहीं, आणि जो सेवकांचे दृष्टीनें सर्वत्र पाहतो, तो पुष्कळ काळपर्यंत ऐश्वर्य भोगितो. एकांत करावयाचा असल्यास पर्वतावर, माडीवर, अरण्यांत अथवा जेथें कोणी ऐकणार नाहीं अशा ठिकाणीं जावें. अमित्र आपलें गुह्य जाणावयास योग्य नाहीं; सुहृद् आहे परंतु शहाणा नव्हे, अथवा शहाणा आहे, परंतु जिव्हा स्वाधीन नाहीं त्यास गुह्य सांगूं नये. परीक्षा केल्यावांचून प्रधान करूं नये; जो पुरुष अर्थ संपादन करावयास जाणतो, व गुह्य गुप्त राखितो, तोच प्रधानाच्या पदवीस योग्य आहे असें समजावें. ज्याचीं कार्यें घडून आल्यापूर्वीं कचेरीस बसणारांसही समजत नाहींत, तो राजा सर्व राजामध्यें श्रेष्ठ. द्रव्यादिकांचे लोभानें जो पापकर्में करितो तो हेतु सिद्धीस न जातां प्रसंगीं जीवित्वापासूनही भ्रष्ट होतो. आपले हातून पुण्यकर्में घडलीं असतां सुख देतात, आणि न घडलीं असतां पश्चात्ताप उत्पन्न करितात.

ज्या ब्राह्मणानें वेदाध्ययन केलें नाहीं तो जसा श्राद्धास बसावयाचे उपयोगीं नाहीं त्याच प्रकारें ज्याला शत्रूशीं वर्तणूक करण्यामध्यें हे षड्गुण समजत नाहींत तो मसलतीस उपयोगी नाहीं. त्यांतील प्रथम गुण १ मैत्री, २ बिघाड, ३ चढून जाणें, ४ ठाम असणें, ५ फूट करणें, आणि ६ दुसऱ्याचा आश्रय धरणें. आपली पूर्ववतच स्थिति आहे, किंवा वृद्धि आहे, किंवा क्षय आहे हें ज्या राजास समजतें,

ज्याला मंत्री आदिकरून षड्गुण समजतात, आणि ज्याचें शील चांगलें, त्याच्या स्वाधीन राज्य राहतें. त्याच्या क्रोधानें शत्रु भितात, ज्याच्या हर्षानें लोकांस लाभ होतो, आणि ज्याच्या भांडाराची चौकशी वारंवार होते, त्यासच चहूंकडून द्रव्य मिळतें.

राजा ह्मणून आपली आज्ञा मान्य करून सर्व आपणांस सेवितात, यास्तव आपल्या डोईवर छत्र आहे इतक्यानेंच संतुष्ट असावें; संपत्ति सेवकादिकांकडून भोगवावी, आपण एकट्यानेंच सर्व भोगूं नये. ब्राह्मणाचें स्वरूप ब्राह्मण जाणतो, स्त्रीचें स्वरूप भ्रतार जाणतो, प्रधानाचें स्वरूप राजा जाणतो, आणि राजाचें स्वरूप राजाच जाणतो.

वध करावयास योग्य अपराध्यास आणि हातीं सांपडलेल्या शत्रूस अंगीं सामर्थ्य असल्यास मारावेंच. तो नीचत्व पत्करून आपली सेवा करावयास सिद्ध झाला तथापि त्यास सोडूं नये. सोडिल्यास त्यापासून लवकरच अपकार होईल. १ देव, २ राजा, ३ ब्राह्मण, ४ वृद्ध, ५ बालक, आणि ६ रोगी यांजविषयीं क्रोध आला तरी सांवरावा. ज्यांत बरें निष्पन्न होणार नाहीं; अशा कज्यांत मूर्ख आहेत तेच पडतात, शाहणा पडत नाहीं; आणि ह्मणूनच शाहण्यास लोक बरा ह्मणतात, आणि त्यास अनर्थ बाधत नाहींत.

या लोकीं अथवा परलोकीं कर्मानुसार संपत्ति किंवा दरिद्र प्राप्त होतें; बुद्धिमानासच द्रव्य मिळतें. आणि मंद-

बुद्धीस मिळत नाहीं असें नाहीं. विद्या, चांगला स्वभाव, वय, द्रव्य, आणि उत्तम कुळ हीं ज्यांस आहेत त्यांचा अवमान मूर्ख निरंतर करीत असतो. नीचकर्मी, मूर्ख, दोषदृष्टि, अधार्मिक, दुष्टवचनी आणि क्रोधी, अशा पुरुषांस अनर्थ लवकर प्राप्त होतात. कंटाळा केल्यावांचून देणें, वचन पाळणें, आणि यथायोग्य भाषण, हीं ज्यापाशीं आहेत त्यास शत्रूही वश होतात. जो दुसऱ्यास ठकवीत नाहीं, स्वतां परम सावध, उपकार जाणणारा, बुद्धिमान्, आणि सरळ स्वभावाचा, असा पुरुष निर्द्रव्य असला तरी त्यास सेवक, मित्र इत्यादिक फुकट मिळतात. एकटाच संपत्ति भोगणारा, दुष्ट उपकार न जाणणारा, आणि निर्लज्ज असा राजा सोडावा. १ धैर्य, २ क्रोध जिंकणें, ३ इंद्रियें जिंकणें, ४ निर्मलता, ५ करुणा, ६ मृदु भाषण आणि ७ मित्रांशीं तूट न करणें, हीं सात सर्व लोकांत ऐश्वर्याची प्राप्ति करणारीं होत. आपले जवळ नेहमीं राहणाऱ्या निर्दोषी मनुष्यास जो छळितो त्यास सर्प घरांत असतां जशी झोंप येत नाहीं, तशी रात्रीं झोंप येत नाहीं.

जें द्रव्य स्त्रियांचें हातीं, उन्मत्ताचे हातीं, पतिताचे हातीं, अथवा मूर्खाचे हातीं गेलें, तें निःसंशय गेलें असेंच जाणावें. जेथें स्त्रियांचें प्राबल्य, कपटयाशीं प्रसंग अथवा पोरबुद्धी राजा आहे, तेथें राहणारे लोक दगडाचे नावेंत बसून जाणारे नदींत जसे बुडतात, तसे बुडतात. ज्याचे हातून आपलीं कार्यें होतात, त्याचे गुणदोषावर लक्ष न ठेवणारे ते शहाणे

होत; कारण तसें लक्ष ठेविल्यानें कार्याचा नाश होतो. ज्याची प्रशंसा कपटी, भाट, अथवा शिनळ स्त्रिया करितात, तो पुरुष फार दिवस वांचत नाहीं.

हे राजा, ज्याचें तेज अपरिमित, ज्याचीं धनुष्यें मोठीं, आणि बाण अति तिखट, अशा पांडवांस सोडून तूं दुर्योधनाचे ठायीं ऐश्वर्यभार ठेविला आहेस; परंतु जसा ऐश्वर्यमदानें धुंद झालेला बळी त्रैलोक्याचे राज्यापासून भ्रष्ट झाला, तसें तें त्या ऐश्वर्यापासून भ्रष्ट झालेलें तूं सत्वर पाहशील.

---

## अध्याय सातवा.

धृतराष्ट्र ह्मणतो, हे विदुरा ! मनुष्य ह्या कांहीं एक करण्याविषयीं समर्थ नाहीं; जशी लांकडाची बाहुली दोरी हालविणाराचे स्वाधीन असते, तसा मनुष्य ईश्वरी सत्तेचे स्वाधीन आहे; तस्मात् तूं बोलणार तें बोल. मी ऐकतो. विदुर बोलतो, राजा ! वाटूं नये त्यासमयीं ब्रहस्पतीही बोलला असतां अज्ञानत्व पावून त्याचा अवमान होतो, मग आमची कथा काय ? परंतु तूं बोलवितोस ह्मणून मी बोलतो, ऐक. ; ज्यापासून द्रव्य मिळतें, जो गोड बोलतो, जो बुद्धि सांगतो, अथवा जो आश्रय देतो, तो प्रिय होतो. तेंच त्यानें न केलें असतां तो अप्रिय होतो, ह्मणून त्यास प्रिय

ह्मणूं नये; कारण जो प्रिय तो प्रियच असतो, तो कदापि अप्रिय होत नाहीं. जो आपणास आवडत नाहीं, त्याचे सद्गुण असले तरी ते दुर्गुणसे दिसतात, आणि ज्यावर आपली प्रीति असते त्याचे दुर्गुणही सद्गुणसे वाटतात.

दुर्योधन जन्मला त्या काळींच मी तुला सांगितलें कीं, या एका मुलाच्या त्याग केल्यानें तुझ्या शंमर पुत्रांचें कल्याण होईल, नाहींतर नाश आहे; परंतु तूं तें ऐकिलें नाहींस. ज्या गोष्टीनें फार हानि होते, ती गोष्ट ऐकूं नये; परंतु ज्या गोष्टीनें अल्प हानि होऊन पुष्कळ लाभ होतो, ती हानि असें ह्मणूं नये; तर ज्यांत अल्प लाभ आणि फार नाश होतो त्याला हानि ह्मणावी. कित्येक पुरुष फक्त द्रव्यानें परिपूर्ण असतात, आणि कित्येक फक्त गुणांनीं परिपूर्ण असतात; जे द्रव्यानेंच परिपूर्ण असतात त्यांचा त्याग करावा; जो सर्व गुणांनीं संपन्न, आणि नम्रतेनें युक्त असतो तो प्राणिमात्राचा नाश करावयास कधींही इच्छीत नाहीं.

दुसऱ्यावर आळ घालण्याविषयीं ज्यांची वासना, दुसऱ्याचें दुःख पाहून ज्यांस बरें वाटतें, आणि जे एकमेकांशीं विरोध लावणारे, त्यांस निरंतर तेच उद्योग करावेसे वाटतात. ज्यांचें दर्शन घेणें प्रशस्त नव्हे, ज्यांचे संगतींत मोठें भय, ज्यांपासून द्रव्य घेतलें असतां मोठा दोष होतो, आणि द्रव्य दिलें असतां मोठी चिंता उत्पन्न होते, जे एकमेकांमध्यें तूट करणारे, जे लोभी, निर्लज्ज, शठ, पातकी शिवाय आण-

खोही मोठे मोठे दोष आचरणारे, त्या मनुष्यांची मैत्री कधीं करूं नये. कारण अशांची मैत्री सुटली असतां त्यांवर केलेली प्रीति, उपकार, अथवा इष्टत्वांतलें सुख, हें फुकट जाऊन तेच उलट आपली निंदा करण्यास आणि नाश होईल तो उद्योग करण्यास तयार होतात. उत्तमाशीं मैत्री केल्यानें त्याशीं बिघडलें असतांही आपल्यास त्याजपासून अपकार होत नाहीं. थोडाही अन्याय झाला तरी जो क्षमा करीत नाहीं, अशा नीच, क्रूर, कुमनुष्यापासून बुद्धिमानानें फार दूर रहावें.

आपले भाऊबंदांमध्यें जे कोणी दरिद्री, दीन अथवा रोगी असतात, त्यांवर जो कृपा करितो त्याची संतती व संपत्ति वाढते, आणि त्यास पुष्कळ सुख प्राप्त होतें. आपलें कल्याण व वृद्धि इच्छिणाऱ्यानें आपलें गोत्र वाढवावें. ह्मणून हे राजा ! कुळाची वृद्धि कर, मारूं नको. राजा ! पांडव परम शूर आहेत त्यांवर कृपा ठेव, त्यांस उदरपोषणाकरितां कांहीं गांव दे. असें केल्यानें लोक तुला बरें ह्मणतील. बाबा ! आपले भाऊबंदांबरोबर विरोध करूं नये. जो आपलें बरें इच्छितो त्यानें कोणतींही सुखें भोगणें तीं भाऊबंदांसहवर्तमान भोगावीं; त्यांजसह भोजन करावें, गोष्टी बोलाव्या, आणि त्यांजवर प्रीति करावी. त्यांशीं बरें असल्यास ते तारितात, नाहीं तर तेच बुडवितात. ह्मणून तूं पांडवांशीं बरेपणा राख, ह्मणजे शत्रूंस अजिंक्य होशील. आपण श्रीमंत असतां आपले कुटुंबांतील कोणी जवळ

आला तर आपणास सामर्थ्य असून त्याचे क्लेश दूर न केले तर पातक लागतें.

तुझे पुत्रांनीं पांडवांस मारिलें, अथवा पांडवांनीं तुझे पुत्रांस मारिलें तथापि दोहींकडून तुलाच पश्चात्ताप होईल? कारण दोन्ही तुझेच गोत्रज आहेत, याचा विचार कर. पुढें एकट्यानें खाटल्यावर बसून संताप करावा हें फार वाईट. अन्याय सर्वांपासून होतातं; जर पश्चात्ताप करून यापुढें सावध होशील, तर आजपर्यंत तुझ्यापासून झालेले अन्याय धुऊन जातील. आपण ज्यांचा अपराध केला त्यांनीं संतुष्ट होऊन क्षमा केली असतां त्या दोषापासून सुटका होतो. जो सुज्ञांनीं उपदेशिलेल्या गोष्टींचा त्या त्या प्रसंगीं अनुभव घेतो, त्याचें पाऊल वांकडें पडत नाहीं.

ज्या कर्मापासून पातक घडणार तें कर्म जो आरंभित नाहीं तो वाढतो. जो मागें केलेल्या पापकर्माचा विचार न करितां पुढें तशींच करीत जातो, तो दुष्टबुद्धि घोर नरकांत पडतो. १ मद्यपान, २. निद्रा, ३ आसमंतात कोणी ऐकेल त्याची चौकशी न ठेवणें, ४ मुखच्छाया, ५ दुष्टावर विश्वास आणि ६ अनाडी सेवक, या सहा द्वारांनीं गुह्य गोष्ट फुटते; म्हणून जो या द्वारांस जपतो, धर्मार्थकामीं लक्ष ठेवितो, आणि युद्धीं सावध राहतो, तो शत्रूपेक्षां वरचढ होतो. शास्त्र जाणल्यावांचून आणि आपणाहून जे थोर त्यांची सेवा केल्यावांचून आपलें हित समजत नाहीं. १ समुद्रांत पडलें तें फुकट गेलें, २ जो सांगितलेलें करीत नाहीं त्याचे कानांत

पडलें तें फुकट गेलें ३ जडबुद्धीस सांगितलेलें शास्त्र फुकट गेलें, आणि ४ अग्निहोत्रावांचून होमिलें तें फुकट गेलें. शहाण्यानें पूर्वी पुढील परीक्षा करून मग दुसऱ्याशीं मैत्री करावी. आपणास ज्याची मैत्री करावयाची असेल, त्याचें कुळशीळ कसें आहे, तो आपल्या अनुभवास कसा येतो, त्याबद्दल लोक काय ह्मणतात, त्याची आकृति कशी आहे, आणि तो किती शहाणा आहे, . ह्या सर्व गोष्टींचा विचार करून मग त्याशीं मैत्री करावी.

नम्रता अपकीर्तीचा नाश करिते, पराक्रम अनर्थाचा नाश करितो, क्षमा क्रोधाचा नाश करिते, आणि धर्माचरण दुर्लक्षाचा नाश करितें. कुळाची परीक्षा करणें झालें तर उपजीविकेचें साधन, ठावठिकाण, वरदार, आचरण, आणि वस्त्रपात्र इतकें पहावें. बलात्कारानें मनांत उत्पन्न झालेल्या एखाद्या दुष्ट मनोरथाचा तिरस्कार करणें. हें संन्याशासही कठीण आहे, मग गृहस्थाची कथा काय ? असें असतांही जो मन आंवरतो तो धन्य होय.

थोरांची संगत करणारा, विद्वान्, धार्मिक, हास्यमुख, पुष्कळ इष्ट मित्र असणारा, गोड बोलणारा, आणि निर्मळ हृदयाचा, अशा इष्टावर अत्यंत प्रीति करीत असावी. उत्तम कुळांतला असो किंवा वाईट कुळांतला असो, परंतु जो थोरांची मर्यादा उल्लंघीत नाहीं, ज्याची स्वधर्मावर वासना, जो नम्र व सद्बुद्धिमान् तो नांवाच्या शंभर कुलीनांपेक्षां श्रेष्ठ होय. ज्या दोघांचें आचरण समान, निश्चिती समान

आणि ज्ञान समान. त्यांची परस्पर मैत्री फार दिवस चालते. जो दुर्बुद्धी व आडाणी तो मित्रत्वास वर्ज करावा; कारण त्याचेठायीं मित्रत्वाचा नाश होईल. त्याप्रमाणेंच दुष्ट, मूर्ख, कोपी, अविचारी आणि अधर्मी, यांशीं मैत्री करूं नये.

जो केलेलें उपकार जाणणारा, धार्मिक, सत्यवादी, जो मनाचा हलका नव्हे, ज्याचा स्नेह दृढ आणि ज्यास इंद्रियें वश, अशा मित्रास कदापि सोडूं नये. इंद्रियांचे हातून विषय सोडविणें हें परम कठीण आहे. एक वेळ सोडविलेल्या विषयांवर इंद्रियांची पुनः प्रीति करविणें यासारखें लाजिरवाणें दुसरें नाहीं. १ प्राणिमात्राशीं नम्रता, २ दुसऱ्यास दोष न ठेवणें, ३ क्षमा, ४ धीर, आणि ५ मित्राचा अपमान न करणें, हीं आयुष्याची वृद्धि करणारीं होत. कुमार्गानें किती द्रव्य गेलें हें पाहून जो सावध होतो, आणि बाकी उरलेलें चांगलें चालून राखूं इच्छितो तो शहाणा समजावा. जें दुःख पुढें होणार त्याला जो आजपासून उपाय मांडितो, सांप्रत जें होतें आहे तें भोगिल्यावांचून सरणार नाहीं हें जाणून जो वर्ततो, आणि मागें जें भोगलें त्याचा अनुभव जो विसरत नाहीं, त्याचीं सर्व कार्यें साधतात.

काया, वाचा, आणि मन, यांचा ज्या ज्या कर्मावर निरंतर भर राहतो, तें तें साध्य होतें; ह्मणून सदा पुण्यकर्मावर आवड ठेवावी. १ मंगळ पदार्थांस स्पर्श, २ सहायाची

अनुकूळता, ३ शास्त्रज्ञान, ४ उद्योग, ५ सर्वांशीं सरळपणा आणि ६ साधुसमागम, हीं थोरपणा देणारीं होत. निरंतर जो उद्योगी त्यास धनलाभ आणि कल्याण हीं प्राप्त होतात. क्षमेहून हितकर्त्ता अथवा लक्ष्मी देणारा असा दुसरा पदार्थ नाहीं, ह्मणून आपली वृद्धि इच्छिणाऱ्यानें क्षमा धरावी. ज्यांत स्वधर्म आणि स्वार्थ यांची हानि होत नाही, तें सुख हवें तितकें भोगावें; नेमावरच फार भर ठेवूं नये; ह्मणजे खावयाचे पदार्थ अथवा स्त्रीभोग आदिकरून जीं शास्त्राज्ञेनें प्रशस्त आहेत, त्यांवर आपली दृढ वासना असल्यास आग्रह धरून जीव आटवून फळ नाहीं. जे दुःखानें पीडिलेले, उन्मत्त, नास्तिक, आळशी, उत्साहरहित आणि ज्यांस इंद्रियें दमवितां येत नाहींत, अशा पुरुषांपाशीं लक्ष्मी रहात नाहीं. जो सर्वांशीं नीट आणि ज्यास सर्वांचा संकोच त्यास अशक्त असें मानून दुष्ट लोक उपद्रव करितात. अत्यंत गुणवान्, उत्कृष्ट दाता, अति शूर, अत्यंत प्रामाणिक आणि अत्यंत शहाणा यांजवळ लक्ष्मी रहात नाहीं; कारण गुणाहून लक्ष्मी थोर असें न मानतां तो तिचा व्यय करीत असतो. लक्ष्मी आंधळी आहे; ती अत्यंत गुणवानापाशीं अथवा अत्यंत निर्गुण्यापाशीं राहते याचा नेम नाहीं; ती कोठेंही राहते. वेदाध्ययनाचें फळ हेंच कीं, घरीं अग्निहोत्र असावें; शास्त्र पढल्याचें फळ हेंच कीं, सद्गुण लागावे; स्त्रीचें फळ हेंच कीं, संभोग आणि पुत्रप्राप्ति व्हावी; आणि धनाचें फळ हेंच कीं, त्याग आणि भोग हीं व्हावीं. जो अधर्मानें

मिळविलेल्या द्रव्यानें परलोकसाधनासाठीं यज्ञदानादिक करितो; तो मरण पावला असतां त्यास या यज्ञदानादिकांचें फळ परलोकीं मिळत नाहीं; कारण तें अधर्माचें द्रव्य ह्मणून. अवघड मार्गी, वनांत, दुर्गांत, विपत्तीमध्यें, कोणी घावरें केलें आसतां अथवा मारायास शस्त्र उपसलें असतां सत्यशीलास भय उत्पन्न होत नाहीं. आपला बोजा राखणें, इंद्रियदमन, चौकसपणा, उन्मत्त न होणें, धैर्य, स्मरण, आणि कोणतीही गोष्ट विचार करून आरंभणें हीं थोरपणाचीं कारणें होत.

१ तापसाचें बळ तप, २ ब्राह्मवेत्त्याचें बळ वेद, ३ असाधूचें बळ हिंसा, आणि ४ गुणवानाचें बळ क्षमा होय. १ उदक, २ मूळ, ३ फळ, ४ दूध, ५ होमद्रव्य, ६ थोर ब्राह्मणाची आज्ञा, ७ गुरूचें वचन, आणि ८ औषधें हीं आठ सेविलीं असतां व्रताचा भंग होत नाहीं. आपला जीव तसाच दुसऱ्याचा, व आपणास वाईट तें दुसऱ्यास वाईट हें जाणून जो वर्ततो त्यानें सर्व धर्माचें सार जाणिलें असें समजावें. शांतीनें क्रोधास जिंकावें, साधुपणानें असाधूस जिंकावें, दानानें कृपणास जिंकावें, आणि सत्यानें असत्यास जिंकावें. या नवांचे ठायीं विश्वास ठेवूं नये:—१ स्त्री, २ शिनळ पुरुष, ३ आळशी, ४ भ्याड, ५ फार क्रोधी, ६ अभिमानी, ७ चोर, ८ कृतघ्न, आणि ९ नास्तिक. जो सर्वदा नम्र असतो आणि वडिलांची सेवा करितो, त्याची १ कीर्ति, २ आयुष्य, ३ यश, व ४ बळ हीं चार वाढतात.

हे राजा, अत्यंत क्लेशानें, अधर्मानें अथवा शत्रूस शरण जाऊन, द्रव्य मिळवणें हें तुजपासून न होवो. निरक्षरी पुरुष, वांझ बायको, मुलें असून त्यांस खावयास न मिळणें, आणि राजावांचून राज्य या सर्व गोष्टी करवितात. नित्य मार्गक्रमणानें मनुष्य तुटतो, वेठा ठेविल्यानें घोडा तुटतो, उदकाचे अन्यांनीं पर्वत तुटतो, पुरुषाचे वियोगानें बायको तुटते, आणि दुर्वचनानें मन तुटतें; ह्मणजे दुर्वचनें बोलल्या नंतर पश्चात्ताप होऊन मन व्यथा पावतें. अनभ्यास हा वेदशास्त्रांस मळ होय; व्रतें व नेम न करणें हा ब्राह्मणांस मळ होय; उखर भूमि हा पृथ्वीचा मळ होय; असत्य बोलणें हा मनुष्यास मळ होय; नाच व तमाशा पाहणें हा पतिव्रतेस मळ होय; प्रवास करणें हा बायकांस मळ होय; रुपें हा सोन्यास मळ होय; कथील हा रुप्यास मळ होय; शिसें हा कथिलास मळ होय; आणि मर्तो हा शिशास मळ होय. निद्रेनें निद्रेची तृप्ति करूं लागूं नये; स्त्रीसंभोगानें स्त्रीविषयाची तृप्ति करूं लागूं नये; सर्पण घालून अग्नीची तृप्ति करूं लागूं नये; आणि मद्य पिऊन मद्यपानाची तृप्ति करूं लागूं नये.

ज्यानें देऊन देऊन मी जिंकिला, युद्ध करून शत्रु जिंकिला, आणि अन्नवस्त्रांची यथास्थित सोय करून स्त्री जिंकिली, त्याचें जीवित्व सफळ. ज्यापाशीं हजारों रुपये आहेत ते उपाशी मरत नाहींत; ज्यापाशीं शेंकडों आहेत तेही पोट भरितात; आणि ज्यापाशीं कांहीं नाहीं त्यांचेंही

ईश्वर चालवितो. तस्मात् धृतराष्ट्रा, तूं अधिक इच्छा सोड, जें देव देईल त्यांत संतुष्ट रहा. कारण, सृष्टीवर जितकें धन, धान्य, पशु आदिकरून आहेत, तितकें सर्व एकास मिळालें असतांही त्यास पुरेसें होणार नाहीं; हें ज्यास खरें खरें समजतें तो मोह पावत नाहीं.

हे राजा! पुनःपुनः तुला सांगतों, पांडव आणि कौरव हे तुला समान असतील, तर उभयतांवर समकृपा ठेऊन पांडवांचा राज्यविभाग त्यांचा त्यांस दे, ह्मणजे तुझें कल्याण होईल.

---

# अध्याय आठवा.

विदुर ह्मणतो, हे धृतराष्ट्रा, साधु ज्याचा सत्कार करितात, जो अभिमानरहित, जो आपली शक्ति पाहून कोणतेंही काम आरंभितो, तो लवकरच साधु होतो आणि साधुपणाचे पोटीं फार सुख पावतो. मोठा लाभ होत आहे परंतु तो अधर्मयुक्त आहे. तर त्याजकडे जो पहात नाहीं, तो पुरुष दुःखें टाकून सुखी राहतो; जसा मेंग टाकून सर्प सुखी राहतो. खोटें संपादून जय मिळविणें, राजापाशीं चहाडी सांगून उपद्रव करणें, आणि गुरु अथवा वडील यांशीं प्रतारणा करणें, हीं ब्रह्महत्येसमान होत.

दुसऱ्यास वाईट दृष्टीनें पाहणें आणि आपले मृत्यूस लव-

कर बोलावणें, हीं दोन वेगळीं नाहींत. अतिवाद सांगणें आणि द्रव्याचा नाश करणें हीं दोन्ही एकच. गुरुसेवा न करणें, आणि थोड्या दिवसांनीं पुष्कळ विद्या इच्छिणें, आणि थोड्या विद्येनें पुष्कळ येतें असा आव घालणें, हे तीन विद्येचे शत्रु होत. विद्या इच्छिणारांनीं हे सात दुर्गुण सोडावे:—१ आळस, २ गर्व, ३ चंचळवृत्ति, ४ गोष्टी; ५ दांडगेपणा, ६ मान, आणि ७ लोभीपणा. सुख इच्छिणारास विद्या व्हावयाची नाहीं आणि विद्यार्थ्यास सुख मिळावयाचें नाहीं, ह्मणून सुखार्थी यानें विद्या सोडावी, आणि विद्यार्थ्यानें सुख सोडावें. सुख आणि विद्या हीं दोन एकत्र राहणारीं नाहींत. लांकडांनीं अग्नि तृप्ति होत नाहीं, नद्यांनीं समुद्र तृप्त होत नाहीं, सर्व प्राणीमात्रांनीं मृत्यु तृप्त होत नाहीं, आणि पुरुषांनीं शिनळ स्त्री तृप्त होत नाहीं. आशा धैर्यास नाशिते, काळ पदार्थमात्रास नाशितो, क्रोध लक्ष्मीस नाशितो, कृपणता कीर्तीस नाशिते, आणि अपालन पशूंस नाशितें. बापा, सर्व पुण्यकर्मांमध्यें श्रेष्ठ असें एक तुला सांगतों, तें मनांत दृढ धर. तें असें कीं, कामास्तव, लोभास्तव, अथवा जीवितास्तव, धर्म सोडूं नको. अधर्मास कधीं जय नाहीं. धर्म हा नित्य होय. सुखदुःखें हीं येतात जातात, जीव नित्य आहे, आणि जीवाचें कारण अविद्या, ती मात्र अनित्य; ह्मणून जी अनित्य ती तूं सोड, आणि ज्याचा कधींही नाश नाहीं असें जें नित्य वस्तु परमेश्वर त्याचे ठायीं निष्ठा ठेवून संतोष पाव.

सर्व लाभांमध्यें संतोष हाच थोर लाभ आहे. मोठे मोठे
ऌाढ्य व पराक्रमी राजे धनधान्यानें पूर्ण अशा सकल पृ-
ीचें फालन करून आणि सकल विषय भोगून संतोष न
ावतां शेवटीं सर्व टाकून काळाचे स्वाधीन होतात. अशी
ा मृत्युलोकची वस्ती आहे. पुष्कळ क्लेश भोगून वाढवि-
ला असा प्रीतीचा पुत्र मेला असतां दीनवाणीनें रडतात;
ग निरुपाय होऊन त्यास उचलून लवकर घरांतून बाहेर
ाढून लांकडासारिखा रचून जाळितात; आणि राख
ाली ह्मणजे सोयरीं धायरीं व इष्टमित्र निराश होऊन
ागें येतात. मेलेल्याचें शरीर अग्नि, किडे, अथवा पक्षी
ातात. द्रव्य दुसराच भोगितो, आणि पुण्य किंवा पाप हीं
ोन मात्र त्याचे संगतीं जातात; तस्मात् पुण्याचा ठेवा
ोडून बरोबर न्यावा हें बरें आहे. या मृत्युलोकाचे वर
सा स्वर्ग आहे तसाच खालीं नरक आहे; ह्मणून हे राजा,
ो नरक तुला स्पर्श न करो. हा माझा उपदेश ऐकशील
र या लोकीं यश पावशील; आणि येथें व परलोकीं तुला
य होणार नाहीं. जीवित ही एक नदी आहे, तिचे ठायीं
र्म हें तीर्थ, सत्य हें उदक, धैर्य हीं तटें आणि दया ह्याच
च्या लहरी होत; तर अशा नदींत ज्यानें स्नान केलें तो
वित्र झाला. जो सदा निर्लोभी तोच पुण्यवान् जाणावा.

हे राजा, जिच्यामध्यें कामक्रोधादिक सुसर आहेत
ाणि श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, हें पंचेंदियरूप
ल आहे, अशा संसारनदीमध्यें धैर्यरूप नौका करून

जन्ममृत्यु तरून जा. बुद्धीनें वडील, धर्मानें वडील, विद्येनें वडील, आणि वयानें वडील, अशा आपल्या भाऊबंदांस संतुष्ट ठेऊन बरें वाईट करणें न करणें हें त्यांस विचारून जो करितो, तो कधींही ठकत नाहीं. धैर्य दृढ करून स्त्री, विषय, आणि जिव्हा यांपासून आपणास राखावें; डोळे सावध ठेवून हातपायांस राखावें; मन सावध ठेवून कानाडोळ्यांस राखावें; आणि नेमावर आणून मन आणि वाचा हीं राखावीं. जो यथाकाळीं स्नानसंध्यादिक करितो, वेदशास्त्राध्ययन करितो, दाष्याचें अन्न खात नाहीं, सत्य बोलतो, आणि सत्कर्म करितो, असा ब्राह्मण ब्रह्मलोकीं जातो. जो वेदाध्ययन, अग्निहोत्र, यज्ञयागादिक कर्मे, प्रजापालन, गोब्राह्मणपालन इत्यादि करून युद्धामध्यें शौर्य प्रगट करितो तो क्षत्रिय स्वर्गी जातो. जो अध्ययन करून ब्राह्मण, क्षत्रिय, आणि आश्रित यांस द्रव्य विभागून देतो, आणि यज्ञायागादिक पुण्यकर्मे करितो, तो वैश्य मेला असतां स्वर्गी दिव्य सुखें भोगितो. जो शूद्र ब्राह्मण, क्षत्रिय, व वैश्य यांची यथायोग्य सेवा करितो, तो निष्पाप होऊन देह सोडिल्यावर स्वर्गसुखें भोगितो.

राजा, हा चहूं वर्णांचा धर्म तुला सांगितला, याचें कारण सांगतों ऐक. राज्यावांचून पांडवांचे हातून क्षत्रियधर्म होणार नाहीं, ह्मणून त्यांस राजनीतिप्रमाणें देणें योग्य आहे, तें राज्य देऊन त्यांचा स्वधर्म राख. यांत तुझे सर्व मनोरथ पूर्ण होऊन शेवटीं जें नित्य, ज्यास वीट नाहीं, जें

प्राप्त झाल्यानें जन्ममृत्यूच्या येरझारा टळतात असें सुख तूं पावशील.०

या प्रकारें महा बुद्धिमान् परमसाधु आणि पुण्यकीर्ति असा विदुर धृतराष्ट्र राजास राजधर्म, आणि राजनीति सांगता झाला. ती श्रीवेदव्यासानें भारतामध्यें उद्योगपर्वांतील तेहतिसांपासून चाळीस अध्यायांपर्यंत संक्षेपानें वर्णिली आहे. त्यांतील आशय घेऊन हा महाराष्ट्र भाषेंत ग्रंथ केला आहे. ही नीति, ग्रंथ नित्य वाचून किंवा ऐकून जो यांतील एक एक गोष्टीचा अनुभव घेईल त्याचे सर्व दोष जातील; अनर्थ टळतील; दुःख नाहींसें होईल; लोकांमध्यें मान्यता वाढेल; त्याला संकटें प्राप्त होणार नाहींत, काम, क्रोध, लोभ इत्यादिकांची पीडा होणार नाहीं; लक्ष्मी प्राप्त होईल, सदासर्वकाळ त्याच्या चित्तवृत्ति स्वस्थ राहतील; आणि त्यास मृत्यूपासून भय वाटणार नाहीं. नंतर त्रैलोक्याचा स्वामी, परम कृपाळु, आणि सर्व मनोरथांचा पूर्णकर्त्ता असा ईश्वर त्याचा सखा होऊन अंतकाळीं त्यास आपल्या निजधामास नेईल.

---

## यक्षप्रश्न.

वैशंपायनऋषि जन्मेजयराजास सांगतातः—कोणे एके समयीं धर्म, भीम, अर्जुन, नकुळ, सहदेव हे पांच पांडव द्वैत

वनांत रहात असतां एक ब्राह्मण येऊन त्यांस बोलिला, महाराज, माझ्या अग्निहोत्राच्या अरणी ( ह्मणजे विस्तव पाडायाचीं लांकडें ) वृक्षावर ठेविल्या होत्या त्या एक मृग घेऊन पळाला, त्याचा शोध करून मला अरणी आणून द्याव्या; नाहीं तर अग्निहोत्राचा भंग होतो. असें ब्राह्मणाचें वचन कानीं पडतांच पांचही पांडवांनीं धनुष्यबाण घेऊन सर्व रान शोधिलें, परंतु मृगाचा ठिकाण लागला नाहीं; आणि क्षुधेनें व तृषेनें फार पीडित होऊन ते सारे एका वडाच्या वृक्षाखालीं बसले असतां धर्मराजा बोलतो, नकुळा, तृषेनें माझे प्राण व्याकुळ झाले आहेत, कोठून तरी पाणी आण. तें ऐकून नकुळ एका उंच वृक्षावर चढून चहूंकडे पाहूं लागला, तेव्हां दूर एक पाण्याचें तळें त्याच्या दृष्टीस पडलें. मग तो त्या संधानानें तेथें जाऊन पाण्यास शिवतांच वृक्षावरून शब्द झाला कीं, ' अरे ! माझे प्रश्न आधीं सांग आणि मग पाणी पी; न सांगतां पिशील तर मरशील. ' त्या समयीं तें भाषण न मानून पाणी पितांच नकुळ अचेतन पडला. तेव्हां त्याचे शोधास धर्मानें भीम पाठविला. तसेच अर्जुन, सहदेव हेही एक एकाच्या शोधास पाठविले, परंतु ते चौघेही पाणी पिऊन तेथेंच मूर्च्छित पडले. धर्मराजानें त्यांची फार वेळ वाट पाहिली, परंतु कोणीच येत नाहीं असें पाहून तो चिंताग्रस्त होऊन अरण्य शोधीत शोधीत त्या उदकाजवळ आला, आणि तेथें चौघेही बंधु अचेतन पडलेले पाहून फार दुःख करूं लागला. इतक्यांत

वृक्षावरून वाणी झाली. कीं, अरे, या स्थळाचा स्वामी मी यक्ष आहें; तुझे बंधु मी मारिले. आतां जर तूं माझ्या प्रश्नांचीं उत्तरें सांगशील, तर दैवयोगानें पुनः ते जिवंत होतील; आणि माझी आज्ञा मोडून तूंही उदक प्यालास तर त्यांसारखी तुझीही दशा होईल. असें भाषण ऐकून धर्मराजा बोलतो, यक्षा, तुझे कसकसे प्रश्न आहेत ते बोल, मी यथाज्ञानानें त्यांचीं उत्तरें देतों. तें ऐकून यक्ष प्रश्न करितो, आणि धर्मराज उत्तर देतो.

प्रश्न–ब्राह्मणास मोठेपणा कशानें मिळतो ?

उत्तर–वेदशास्त्र जाणिल्यानें १.

प्र० इच्छिलें फळ कशानें मिळतें ? उ० तपानें २.

प्र० सुकीर्ति कशानें मिळते ? उ० इंद्रियें स्वाधीन ठेविल्यानें ३.

प्र० सुबुद्धि कशानें होते ? उ० वडिलांची सेवा केल्यानें ४.

प्र० ब्राह्मणांस दैवत कोणतें ? उ० वेद ५.

प्र० त्यांचा परंपरागत धर्म कोणता ? उ० तपश्चर्या ६.

प्र० त्यांस मरण कोणतें ? उ० देहादिकांचे ठायीं दृढाभिमान ७.

प्र० त्यांस पाप कोणतें ? उ० दुसऱ्याचा दोष बोलणें ८.

प्र० क्षत्रियांस दैवत कोणतें ? उ० धनुष्यबाण ९.

प्र० त्यांचा परंपरागत धर्म कोणता ? उ० यज्ञादिक करणें १०.

प्र० त्यांस मरण कोणतें ? उ० युद्धांत भय पावणें किंवा पळणें ११.

प्र० त्यांस पाप कोणतें ? उ० शरणागताचें रक्षण न करणें १२.

प्र० जळांमध्यें उत्तम जळ कोणतें ? उ० पर्जन्याचें १३.

प्र० थोडें पेरून पुष्कळ काय होतें ? उ० धान्य आणि याचकांस दिलेलें १४.

प्र० फळांमध्यें उत्तम फळ कोणतें ? उ० सुपुत्र फळ १५.

प्र० जिवंत असून मेलेला कोण ? उ० मूर्ख अथवा ज्याचें शरीर कधींही परोपकारीं पडलें नाहीं तो १६.

प्र० पृथ्वीपेक्षां थोर कोण ? उ० आई १७.

प्र० आकाशापेक्षां उंच कोण ? उ० बाप १८.

प्र० वायूपेक्षां चपळ कोण ? उ० मन १९.

प्र० तृणापेक्षां अधिक अंकुर येऊन कोण वाढतें ? उ० चिंता २०.

प्र० कोणास हृदय नाहीं ? उ० दगडास २१.

प्र० आपल्या वेगानें कोण वाढत्ये ? उ० नदी २२.

प्र० कुटुंबवत्सलास मित्र कोणता ? उ० द्रव्य २३.

प्र० गृहस्थास मित्र कोण ? उ० भार्या २४.

प्र० रोग्यास मित्र कोण ? उ० औषध २५.

प्र० मरणास मित्र कोण ? उ० दान, धर्म २६.

प्र० ह्यालोकीं अमृत कोणतें ? उ० दूध २७.

प्र० थंडीस औषध कोणतें ? उ० अग्नि २८.

प्र० सर्वांस स्थान कोणतें ? उ० पृथ्वी २९.
प्र० धर्माचें मुख्य स्थान कोणतें ? उ० दक्षता ३०.
प्र० यशाचें मुख्य स्थान कोणतें ? उ० दान ३१.
प्र० स्वर्गाचें मुख्य स्थान कोणतें ? उ० सत्य ३२.
प्र० सुखाचें मुख्य स्थान कोणतें ? उ० सदाचरण ३३.
प्र० मनुष्यांस आत्मा कोणता ? उ० पुत्र ३४.
प्र० दैवानें केलेला सखा कोण ? उ० भार्या ३५.
प्र० उपजीवन कोणतें ? उ० पर्जन्य ३६,
प्र० सर्वांस रक्षिता कोण ? उ० द्रव्यत्याग ३७.
प्र० धन्य लोकांमध्यें उत्तम कोण ? उ० परोपकारी ३८.
प्र० धनामध्यें उत्तम धन कोणतें ? उ० विद्याधन ३९.
प्र० लाभांमध्यें उत्तम लाभ कोणता ? उ० आरोग्य ४०.
प्र० सुखांमध्यें थोर सुख कोणतें ? उ० संतोष ४१.
प्र० या लोकीं उत्कृष्ट धर्म कोणता ? उ० भूतदया ४२.
प्र० काय सोडिल्यानें शोक प्राप्त होत नाहीं ? उ० ान ४३.
प्र० कोणाशीं मैत्री उणी होत नाहीं ? उ० साधूंशीं ४४.
प्र० काय सोडिल्यानें प्रिय होतो ? उ० मान ४५.
प्र० काय सोडिल्यानें शोक होत नाहीं ? उ० क्रोध ४६.
प्र० काय सोडिल्यानें संपत्तिवान् होतो ? उ० इच्छा ४७.
प्र० याचकांस कशासाठीं द्यावें ? उ० पुण्यप्राप्ती- ठीं ४८.
प्र० नटनर्तकांस कशासाठीं द्यावें ? उ० लौकीकासाठीं ४९.

प्र० सेवकास कशासाठीं द्यावें ? उ० त्यांचा संसार चालावा यासाठीं ५०.

प्र० राजास कशासाठीं द्यावें ? उ० आपलें भय दूर करण्यासाठीं ५१.

प्र० लोक कशानें वेष्टिला आहे ? उ० अज्ञानानें ५२.

प्र० प्रकाश कशानें वेष्टिला आहे ? उ० अंधारानें ५३.

प्र० मित्र कशानें सोडतो ? . उ० लोभानें ५४.

प्र० स्वर्गी कशानें जात नाहीं ? उ० दुःसंगानें ५५.

प्र० जिवंत असून मेला असा पुरुष कोण ? उ० दरिद्री ५६.

प्र० सर्वांस पूज्य कोण ? उ० गुरु ५७.

प्र० विष कोणतें ? उ० याचना ५८.

प्र० तप कोणतें ? उ० स्वधर्माचरण ५९.

प्र० दम कोणता ? उ० मन स्वाधीन ठेवणें ६०.

प्र० क्षमा कोणती ? उ० हिताहित सहाणें ६१.

प्र० लज्जा कोणती ? उ० न करायाचें तें करणें ६२.

प्र० ज्ञान कोणतें ? उ० सारासार जाणणें ६३.

प्र० शम कोणता ? उ० चित्तांत शांति धरणें ६४

प्र० दया कोणती ? उ० सर्वांस सुख इच्छिणें ६५.

प्र० आर्जव कोणतें ? उ० सर्वांवर. समान चित्त ठेवणें ६६.

प्र० पुरुषांस अजिंक्य शत्रु कोणता ? उ० क्रोध ६७.

प्र० अतिशय मोठी व्याधी कोणती ? उ० लोभ ६८.

प्र० साधु कोणता ? उ० प्राणीमात्रांचा हितकर्त्ता ६९.

प्र० असाधु कोण ? उ० निर्दयी ७०.

प्र० मोह कोणता ? उ० ज्याच्या योगानें धर्म कळत नाहीं तो ७१.

प्र० मान कोणता ? उ० आपणास थोर मानणें ७२.

प्र० आळस कोणता ? उ० स्वहित पाहणें ७३.

प्र० शोक करावयास योग्य काय ? उ० अज्ञान ७४.

प्र० स्थैर्य कोणतें ? उ० स्वधर्मी स्थिरता ७५.

प्र० धैर्य कोणतें ? उ० इंद्रियें स्वाधीन ठेवणें ७६.

प्र० स्नान कोणतें ? उ० मनाचा मळ घालविणें ७७.

प्र० ज्ञानी कोण ? उ० ज्याची समदृष्टि झाली तो ७८.

प्र० पंडित कोण ? उ० स्वधर्म जाणून तसें आचरण करितो तो ७९.

प्र० नास्तिक कोण ? उ० मूर्ख ८०.

प्र० मूर्ख कोण ? उ० वृथाभिलाषी ८१.

प्र० काम कोणाता ? उ० संसारीं वासना ८२

प्र० मत्सर कोणता ? उ० दुसऱ्याचें बरें पाहून वाईट वाटणें ८३.

प्र० अहंकार कोणाचे ठायीं रहातो ? उ० अज्ञानाचे ठायीं ८४.

प्र० दंभ कोणता ? उ० सुकृत प्रगट करणें ८५.

प्र० पैशून्य कोणतें ? उ० दुसऱ्याचें छिद्र काढणें ८६.

प्र० अक्षय नरक कोणत्या कर्मानें होतो ? उ० याचकानें

मागितलें असतां देतों असें ह्मणून मग देत नाहीं त्या कर्मानें ८७.

प्र० ब्राह्मणाचे अंगीं ब्राह्मणत्व कशानें येतें ? उ० सदाचरणानें ८८.

प्र० प्रियवचन बोलणारास कशाचा लाभ होतो ? उ० प्रीतीचा ८९.

प्र० विचारपूर्वक कार्य करणारा काय लाभतो ? उ० जय ९०.

प्र० पुष्कळ मित्र करितो तो काय लाभतो ? उ० सुख ९१.

प्र० स्वधर्मी तत्पर राहणारा तो काय लाभतो ? उ० उत्तम गति ९२.

प्र० सुखी कोण ? उ० ऋणी अथवा प्रवासी नसून घरीं मिळेल ती भाजीभाकर खातो तो ९३.

प्र० आश्चर्य कोणतें ? उ० दररोज मनुष्यें मरतात तीं प्रत्यक्ष पाहत असतां आपण अमर आहों असें लोक मानितात हें ९४.

प्र० मार्ग कोणता ? उ० थोर थोर ज्या वाटेनें गेले तो ९५.

प्र० वर्तमान कोणतें ? उ० काळ सूर्यास अग्नि कल्पून, त्यावर रात्रि व दिवस हीं लांकडें रचून, मास, ऋतु [illegible] पळीनें प्राणिमात्रांस महा मोहरूप कढईंत ठवून नित्य शिजवितो आहे हें वर्तमान ९६.

# नारदनीति प्रारंभ.

एके समयीं धर्मराजा, सर्व बंधूंसहवर्तमान मयासुरानें निर्माण करून दिलेल्या सभेंत बसला असतां, नारद ऋषि हातांत वीणा घेऊन भगवंताचे गुणानुवाद गात अकस्मात् धर्माच्या सभेंत आला; तेव्हां राजानें अर्घ्यपाद्यादिकांनीं त्याची पूजा केली, आणि तो हात जोडून व कुशल प्रश्न करून नम्रतेनें उभा राहिला. राजाची पूजा आदरपूर्वक ग्रहण करून परम संतुष्ट होत्साता नारद त्याच्या कल्याणार्थ बोलतोः—

हे धर्मराजा, तूं धर्मरूपी असून तुझ्या प्रजाही तशाच धर्मशील आहेत, परंतु नामाप्रमाणें तुझी करणी शुद्ध आहेना?

तुला राज्यादिक ऐश्वर्य प्राप्त झाल्यावर तुझें मन धर्ममार्गाच्या ठायीं प्रवर्तलें आहेना?

या सर्व राष्ट्रांत मी राजा आहे असा दुष्ट अभिमान तुला व्यापीत नाहींना?

जो धर्म वडिलोपार्जित चालत आला, त्याप्रमाणें तूं अखंडित चालवितोस कीं नाहीं?

शास्त्रबोधित कर्मैं न केल्यानें जो दोष घडतो, तो तुला लागत नाहींना?

स्वधर्मानें अर्थ संपादन, आणि अर्थानें धर्म संपादन या

क्रमानें निरंतर चालून नारायणाच्या ठायीं मनोभावानें प्रेम ठेवितोसना ?

अधर्मोत्पादक ( अधर्मातें उत्पन्न करणारा ) नव्हे अशा कामाचाच स्वीकार केला आहेसना ?

मुळचीं चंचल इंद्रियें कामाच्या संयोगानें तुला भ्रमिष्ट करून टाकित नाहींतना ?

नित्य व नैमित्तिक अशीं दोन प्रकारचीं कर्मे आवश्यक करण्यास सांगितलीं आहेत, हें जाणून तीं निरंतर करितोसना ?

कर्माचा निषेध केल्याचें वर्म फलाची इच्छा न ठेवणें हें तुझ्या ध्यानांत आहेना ?

यत्नानें किंवा यत्नावांचून साहजिक प्राप्त झालेली सर्व संपत्ति यथाविभागानें सर्वांसहवर्तमान भोगितोसना ?

अदृष्ट ह्मणजे दैव प्रतिकूल किंवा अनुकूल जाहल्यां अंतीं निष्फळ भासमान जो धर्म, त्यापासून तुझी बुद्धि चंचलित जाहल्यामुळें तूं धर्माचरण करण्यास आळस करीत नाहींसना?

रात्रंदिवस लोटत असतां, पाप पुण्य किती जोडिलें याविषयीं प्रतिक्षणीं मनांत विचार करितोसना ?

सर्वकाळ प्रभूचें नामस्मरण केलें असतां शेवटीं उत्तम लोकप्राप्ति खचीत आहे असें समजून आपल्या कल्याणाविषयीं तुझा उद्योग आहेना ?

ज्ञानदृष्टीनें अज्ञानांधास उत्तम मार्गास लावणारे जे साधु

ते मोक्ष धर्मांचे द्वारपाल आहेत असें जाणून त्यांचें सेव करीत आहेसना ?

श्रम ( लोकलज्जा ), संतोष, विवेक, आणि साधुसं यांचा परम आदरानें स्वीकार करून आहेसना ?

काम, क्रोध, लोभ, मोह, मद, आणि मत्सर हे सह रिपु आहेत; याकरितां त्यांचा परित्याग सर्वथा केला पाहि जे. काम परस्त्रीशीं; क्रोध सत्पुरुषाशीं; लोभ स्वशरीराच्य ठायीं; मोह पुत्राचा; मद सुहृदांशीं; आणि मत्सर स प्राणिमात्रांचे ठायीं याप्रमाणें परित्यागाची कल्पना तुल ठाऊक आहे कीं नाहीं ?

वरील शत्रूंचा समयविशेषीं स्वीकारही केला पाहिजे, तो येणेंप्रमाणें. काम ईश्वरभजनाविषयीं; क्रोध इंद्रियदमना विषयीं; लोभ तीर्थाटणाविषयीं; मोह साधुजनांविषयीं; मद दुर्जनांविषयीं; आणि मत्सर प्रपंचाविषयीं; अशा रीतीनें यांचा स्वीकार जाणतोसना ?

षड्विध राजचिन्हें, सत्व, आणि बलाबलाचें लक्षण ह्यांचें तुला यथार्थ ज्ञान आहेना ?

आज्ञा, कीर्ति, द्विजपालन, दान, भोग, मित्रलक्षण या सहा गुणांनीं भूषित असे तुझे प्रधान आहेतना ?

नानाप्रकारच्या व्यूहरचनेंत परम चतुर असून थोडी सेना असली तरी पुष्कळ सेनेचा पराभव करणारे असे तुझे सेनापति आहेतना ?

परम विश्वासू असून निर्लोभी, उत्तम कुळांत जन्मलेले

आणि स्वामिकार्याकरितां प्रसंगास जीवही देणारे असे तुझे सेवक आहेतना ?

वेतनावांचून राजद्रव्य ग्रहण करण्यास अगदीं अयोग्य आहे, असा दृढ निश्चय करून आपआपल्या कामांत इमानानें वागणारे असे खरे खरे गृहस्थ तुझ्या संग्रहीं आहेतना ?

भलत्या कामावर भलत्याचीच योजना, प्रधान कार्यावर दासीपुत्र, हलक्या कामावर उत्तम भाषण करण्यासही योग्य नाहीं अशाची सत्कारपूर्वक पूजा, आणि सत्पात्र भूतांची अवगणना, अशा रीतीचे अयोग्य विचार तुझ्या हातून घडत नाहींतना ?

ज्यानें मोठें काम बजाविलें त्यास वेतनापेक्षां अधिक द्रव्य बक्षिसादाखल देतोसना ?

ज्यांनीं तुझ्या हिताकरितां प्रसंगवशात् प्राणही दिले, त्यांच्या स्त्रीपुत्रादिक कुटुंबाचें रक्षण स्वकीयांप्रमाणें करितोसना ?

तुझे पूर्वावस्थेंतले गरीबगुरीब मित्र आतां तुला येऊन भेटले असतां त्यांस द्रव्य आदिकरून जें पाहिजे तें देऊन संतुष्ट करितोसना ?

दुसऱ्याचे गुण जाणणें, व चित्तांतील अभिप्राय समजणें, हीं मुख्य राजलक्षणें तुझ्याठायीं आहेतना ?

आपले प्रधान सर्व राष्ट्रांत कीर्ति मिळवितात किंवा अपकीर्ति मिळवितात, याचा शोध तूं दूतद्वारा ठेवितोस कीं नाहीं ?

सर्व प्रजा राजद्रव्य यथाविभाग देऊन, आज्ञेचें उल्लंघन न करितां भूमिसेवन ( शेतभात पिकविणें ) यथायोग्य करितातना ?

तीर्थयात्रा करणाऱ्या लोकांस मार्गामध्यें लुटणाऱ्या चोरादिकांचें पारिपत्य करून मार्ग निर्भय आणि सुगम करितोस कीं नाहीं ?

आपल्या सर्व देशांत नीट चौकशी ठेऊन चोरांचा बंदोबस्त चांगला राहण्याकरितां त्यांस चांगली शिक्षा करितोस किंवा नाहीं ?

दीन मनुष्य आपलें दुःख सांगण्याकरितां आले तर त्यांस तुझ्या दरबारीं प्रतिबंध नाहींना ?

तुझें सैन्य जेव्हां परचक्राच्या नाशार्थ जातें त्यावेळेस तें लोकांना हाणमार किंवा लुटालुट करीत नाहींतना ?

आपल्या शरीरास मुंग्या लागल्या असतां जसें आपण हातांनीं त्या त्या ठिकाणीं त्यांचें निवारण करितों त्याप्रमाणें तूं दुष्टांपासून लोकांचें संरक्षण करितोसना ?

सद्गुरूस आपलें शरीर, द्रव्य आणि मनोभाव हीं अर्पण करून आदरानें सेवाधर्म संपादन करणारे असे शिष्य तुझ्या राज्यांत आहेतना ?

केवळ निर्धन श्रोत्रिय ( वेदशास्त्रसंपन्न ) आणि क्षीणवृत्ति ( ज्याची उपजीविका चालत नाहीं ) असा सात्विक साधु, या उभयतांचें दैन्यहरण करून उत्तम रीतीनें पालन करितोसना ?

ब्राह्मणाची कन्या दारिद्र्यामुळें विवाहास योग्य असतां तशीच राहिली, तर त्याला द्रव्य देऊन विवाहकार्यास साह्य करितोसना ?

जे आपल्या कर्मानुसारकृतीमुळें तुझ्या कारागृहांत पडले, त्यांस रोगादिकांनीं पीडित केलें असतां वैद्यापासून औषध देववून त्यांचा सांभाळ नीट करितोस कीं नाहीं ?

परम क्षुधित आलेले अतिथि तुझ्या गृहीं पक्कान्नें भक्षण करून आशिर्वाद देऊन जात असतात कीं नाहीं ?

उत्तम आणि कुलीन गृहस्थानें प्रसंगवशात् धनलुब्ध व हलकट सावकारापासून ऋण काढिलें, आणि त्याच्यानें गरीबीमुळें फेड होईना, म्हणून जर तो लोकलज्जेमुळें देह-त्याग करण्याचे संकटांत पडला, तर मोठ्या साक्षेपानें त्यास तूं ऋणमुक्त करीत असतोसना ?

श्रीमंतांच्या स्त्रियांस जसें आपलें मूल गुणवान् आणि प्रियकर असें वाटतें त्याप्रमाणें तूं याचकांस मानीत असतोसना ?

वेदशास्त्रवेत्ते, आचारसंपन्न आणि उत्तमोत्तम असे तुझे ऋत्विज यज्ञयागादिक कर्में यथासांग करीत असतां तुझ्या अज्ञानानें त्यांच्या कर्मांत व्यंगता वडत नाहींना ?

वाजपेयादिक, पुंडरीक आणि अनेक क्रतु, तुझ्या येथें यथासांग क्रियायुक्त होऊन आज्याच्या आहुतींनीं यज्ञपुरुष सर्वकाळ तृप्त होत आहेना ?

अखंड पुत्रपौत्रादिक वंशपरंपरेनें ॥ग करावा या

हेतूनें दिलेल्या क्षेत्रांची वहिवाट करणारे ब्राह्मण स्वधर्मी तत्पर राहून आनंदयुक्त आहेतना ?

नवग्रहांतील ग्रह तत्तत्कालीं विपरीत आले असतां त्यांच्या शांत्यर्थ त्रिकाळज्ञानी, आणि शुभसूचक असे ज्योतिषी तुझ्या संग्रहीं आहेतना ?

तुझ्या भांडारावर निर्लोभी असून निरपेक्ष असे कारकून, आणि पाकशाळेंत आप्त असून स्वच्छ, तृप्त ( खादाड नव्हत ) आणि शरीरानें बळकट असे आचारी आहेत कीं नाहींत ?

विषम देशीं युद्धप्रसंगानुसार अविचारी, योद्धे आणि अन्य दुर्घट ठिकाणीं स्थिर बुद्धि, असे धैर्यवान् तुझ्या येथें आहेतना ?

समयोचित भाषणी, कुशल, परम चतुर, आणि शिष्टसंमत अशा मनुष्यांस संधिकार्याकरितां मोठ्या शत्रूंकडे योजितोसना ?

तुझ्या सभेमध्यें जितेंद्रिय, परमपवित्र, परमज्ञानी, आणि आचारसंपन्न असे शिष्ट तुझ्या निकट बसत असतात काय?

दुर्जन, शीघ्रकोपी ( तात्कालिक ज्याला राग येतो तो ), कठोर भाषण करणारा, परम संतापी शून्यवादी ( उगाच निष्कारण वाद करण[illegible] ) आणि महापापी अशा मनुष्यांस सभेंत येण्याचा अ[illegible] ठेविला आहेसना ?

साधुसंतांचा [illegible] आणि देवादिकांस

अपशब्द बोलणारा, अशा अपराध्याचा तात ... क जिव्हाच्छेद करितोसना ?

तूं रात्रीच्या उत्तरभागीं ह्मं० पहाटेस उ... ...ासार विचार, नीति, मोक्षमार्ग, आणि भयनिवृत्ति ...विषयीं निरंतर विचार करीत असतोसना ?

नरक ( यातना भोगाण्याचा लोक ), मोक्ष• आणि पाप यांचें स्वरूपासहित तुला ज्ञान आहेना ? आणि तुझ्याकडून लोकनिंदा घडत नाहींना ?

अजेय शत्रूंस जिंकणें, जिंकल्यांचा प्रतिपाल करणें, आणि शरणागतांचें संरक्षण करणें, हीं सर्व तूं करितोसना ?

भुईकोटकिल्ले, आणि डोंगरी किल्ले यांतून प्रतिवर्षी नवीन धान्य, यंत्रादिक सामोग्री, औषधें, आणि उदक यांचा संग्रह उत्तम रीतीनें ठेवितोसना ?

तोडमोड झाली असतां तात्कालिक जागच्याजागीं नीट बरोबर करणारे सुतार आदिकरून कर्मकुशल वेतनदार तुझ्याजवळ आहेतना ?

मठ, विहिरी, देवालयें, धर्मशाळा यांचा जीर्णोद्धार, आणि अखंडित दीप, अखंडित पूजा, व नैवेद्य हे चालविणें हीं तूं करितोस कीं नाहीं ?

प्रचंड पावसाच्या यो... अति पीडित झालेल्या गाई आदिकरून पशु... ...दमयुक्त गोठणें ( गायवाडे, ) आणि पर्जन्या... ...स्थनें बिघडलेलीं शालिक्षेत्रें ( भातशेती ) हीं तुझ्य... ...ात नाहींतना ?

दीन, दुर्बल, अनाथ असे वृद्ध, बाल, दरिद्री, आणि क्षुधेनें अत्यंत पीडित झालेले असे उदरनिर्वाहार्थ वर्षाकाळीं (पावसाळ्यांत) खराब रस्त्यांतून धांवत नाहींतना ?

आप्त व सुहृज्जनांस त्रास आणि साधूंस क्लेश असे दुर्जनदोष तुला लागत नाहींतना ?

कोणी मोठा गृहस्थ राजदर्शनास आला असतां आपलें महत्व कमी होईल म्हणून तुझे उपाध्याय व प्रधान त्याला विघ्न करीत नाहींतना ?

तूं पर्वकाळीं (द्वादशी, पौर्णिमा, अमावास्या, वैधृति, व्यतीपात, याकालीं) स्त्रीसंग, सूर्योदयकाळीं निद्रा, आणि पंक्तींत बसून एकाकी मिष्टान्न भक्षण, असलीं दुराचरणें करीत नाहींसना ?

चारी वर्णांमध्यें यथाविहित विद्यांचा अभ्यास पुत्रांकडून आर्तपणें करविण्याची तुझी चाल आहेना ?

हे पृथ्वीपते राजा, तुझ्या राष्ट्रांत उग्रकामी, मित्रधन हरण करणारा, आणि भर्तृत्याग करणारी स्त्री, अशीं मनुष्यें नाहींतना ?

ज्या रीतीनें याजक (यज्ञकर्में करणारे) पतिताचा परित्याग करितात, व सर्व जातिकुलें भ्रष्टाचा परित्याग करितात, त्याप्रमाणें सर्व प्रजा तुझा परित्याग करीत नाहींतना?

सहस्रावधि मूर्खांचा त्याग करून एक ज्ञानसंपन्न पंडित संग्रहांत आहेना ?

एका मूर्खाच्या समागमानें कीर्ति, लाभ, सुख, संपत्ति-

यांचा सर्वथा नाश होऊन दुर्लौकिकाची प्राप्ति होते हें तुला ठाऊक आहेना ?

तूं आणि प्रधान गुप्त मसलत करीत असतां ती षट्कर्णी होऊन चोहोंकडे पसरत नाहींना ?

दुष्टबुद्धि आणि अति बलवान् असून आपल्या आज्ञा न मानणारे, अशा शत्रूंविषयीं केलेली मसलत फुटली असतां मोठ्या अनर्थाची प्राप्ति होते हें तुझ्या ध्यानांत आहे कीं नाहीं ?

शत्रूंचें वर्तन कसें आहे तें क्षणोक्षणीं समजण्याकरितां दूत ठेवण्याचा विचार केला आहेसना ?

सर्व साधारण असेल तें उघड बोलावें, आणि गुप्त असेल तें मनांत ठेवावें; तसाच मोठा चतुर असल्यास वास्तविक खरेंच असेल तें युक्तीनें बोलावें, या युक्ति तुझ्या ध्यानांत आहेत कीं नाहीं ?

तुझ्या समक्ष मोठा आर्तपणा दाखवून सर्व मजकूर शत्रूंस कळविणारे, असे जे कर्णी असतील त्यांस जाणून आहेसना ?

वार्तिक ( बातमी पोंहोंचविणारे ) अज्ञात ( एकमेकांचा शोध एकमेकांस नाहीं ) राहण्याकरितां त्यांपाशीं तूं तशा रीतीनें वागून त्या त्या काळीं त्यांची रवानगी करितोसना ?

मोठा लाभ खरा, परंतु तो स्वहित नाशक आहे; तर अशा लाभाविषयीं तुझा उद्योग नाहींना ?

आपल्या राज्याचें संरक्षण योद्धयांच्या बलानें होतें,

ह्मणून त्यांस वेळच्या वेळीं वेतन दिलें असतां ते एकचित्त राहून आपलें कार्य उत्तम रीतीनें करितात हें जाणतोसना ?

प्रति महिन्यास वेतन न दिलें तर खर्चाची मोठी निकड होऊन ते फार दुःख पावतात आणि अशा कारणानें समयास मोठा अनर्थही घडतो हें जाणतोसना ?

राजानें सर्व उत्पन्नाचा चतुर्थांश करभार घ्यावा, हें न करितां सर्वस्व हरण करण्याची तुला दुष्ट खोड नाहींना ?

सर्व राज्याचा जमाखर्च राखणारे तुझे अधिकारी, प्रथम प्रहरीं तयार केलेले कागदपत्र हातांत घेऊन ते तुला दाखविण्याविषयीं तुझ्या उभयभागीं उद्युक्त राहतातना ?

तूं सभेंत येऊन सिंहासनावर बसतोस त्या वेळीं राजदर्शनास आलेल्या लोकांस पुष्पाद्यलंकारयुक्त, आणि सुप्रसन्न असे पाहतोसना ?

तुझ्या उभयभागीं रक्तांबरी ( तांबडा पोषाक केलेले, ) खड्गधारी ( तरवार हातांत घेणारे ) आणि सालंकारा कवचकुंडलें धारण केलेला असा सुहृद्क्षत्रियांचा समुदाय असतो कीं नाहीं ?

उत्तम सत्पात्रभूताला दान करण्याच्या प्रसंगीं आणि उत्कृष्ट गुणिजनांस बक्षीस देण्याच्या वेळेस, मध्येंच विघ्न करणारे असे तुझे प्रधान व पुरोहित नाहींतना ?

राजनगर रक्षण करण्याकरितां जवळच्या गांवांचीं शहरें करावीं, आणि खेडीं, घोष ( गवळ्यांची [illegible]

जेथें असते तो, ) यांचे गांव करावे; यांतील अभिप्राय जा-णतोसना ?

घाट, खिंडी, बेटें, अशा ठिकाणीं नाना प्रकारच्या उपद्रवांमुळें रस्ते बंद असतात; तेथें सहकारी चौक्या राखून मार्ग सुगम करीत असतोस कीं नाहीं ?

पर्जन्याचें उदक भूमीवर पडून सर्व नद्या, तलाव आणि पाट यांस परिपूर्ण करितें. त्या उदकाचा व्यय होऊं देऊं नये; कारण त्याच्या योगानें सर्व स्थावर जंगमांचें संरक्षण होतें. तर त्या उदकाचें रक्षण होण्याकरितां सर्व काळ तूं आपल्या राष्ट्रांत भंगरहित जलाशय ठेवितोसना ?

परम लोभी असून चौरकर्मांत निपुण असे अधिकारी, राजस्त्रिया, व राजकन्या हीं प्रजांना विनाकारण पीडा देत नाहींतना ?

दुष्टबुद्धीनें एकाएकीं घात करण्यास प्रवृत्त झालेल्या आततायी पुरुषाचें वर्तमान समजतांक्षणींच, विशेष विचार न करितां तूं त्याचा तत्काळ वध करवितोस कीं नाहीं ?

उत्तम व भल्या गृहस्थाच्या हातून केवळ उदरनिर्वाहार्थ चोरी झाली असतां, दूतांपासून तूं त्यास मुक्त करून स-त्कारपूर्वक त्याच्या घरीं पोहोंचवितोस कीं नाहीं ?

लोकहितार्थ तुला बुद्धिवाद सांगणाऱ्या साधुसंतांना नम्रतेनें सत्कारपूर्वक वंदून त्यांच्या आज्ञांचा स्वीकार क-रीत असतोसना ?

देऊन सर्वशास्त्री, गुरु, देवांच्या मूर्ति,

आणि यज्ञमंडप आदिकरून सर्व पवित्र स्थलें, हीं तुझ्या दृष्टीस पडतांच त्यांस सत्कारपुरःसर वंदन करितोस कीं नाहीं ?

आपलें कल्याण व्हावें या हेतुन सभेमध्यें विद्वज्जनांचा भरणा उत्तम प्रकारचा करून त्यांस गौरवितोसना ?

हे बलवान् राजा, अग्नि, चोर, सर्प, व्याघ्रादिक हिंसक पशु, रोग, राक्षस आणि परचक्र यांपासून आपल्या राष्ट्राचें संरक्षण करीत असतोसना ?

आंधळे, मुके, पांगळे, बहिरे, व्यंग ( हस्तादिक सर्व अवयवांनीं युक्त नव्हत ते ) आतुर ( रोगग्रस्त होऊन मरणोन्मुख झालेले, ) आणि संन्यासी आदिकरून सर्व विरक्त, यांचें उत्तम रीतिनें परिपालन करितोसना ?

सत्पुरुषाचें अदर्शन, अनर्थकारक जे दुष्ट विषय त्यांचें चिंतन, सर्वकाळ द्रव्याचीच आशा, आणि गुप्त मसलतींचें अरक्षण, हीं तूं करीत नाहींसना ?

तुला भेटी देण्याकरितां नाना प्रकारच्या वस्तु घेऊन आलेल्या गृहस्थांचा हेतु व सर्व कार्यभाग ऐकून घेऊन दिलेल्या वस्तूंच्या चौपट त्यांना लाभ करून देतोसना ?

साधूंचीं चिन्हें दाखविणारे, परंतु शिश्नोदरपरायण ( केवळ पोटभरू व स्त्रीलंपट ) अशा लोकांविषयीं तुझें मन विश्वासत नाहींना ?

मातृपितृवर्गाचा सर्वथा अनादर करून, श्वशुरवर्गाचा

सन्मानपूर्वक स्वीकार करणारा असा मूर्ख तुझ्या राज्यांत नाहींना ?

तुझ्या देशांत सुना सासूस, पुत्र पित्यास, शिष्य गुरूस आणि चाकर धन्यास, छळीत नाहींना ?

रोग, अग्नि, शत्रु, हे अगदीं लहान असले, तरी तत्काळ त्यांची शांति करीत असावें; कारण हे क्षणांत वृद्धिंगत होऊन सर्वस्वापहार करण्यास चुकणार नाहींत. हें तुला कळतेंना ?

सर्व राजनीति जी सांगितली आहे ती पूर्ण समजून तिचा अनुभव तुझ्या अंगीं आहेना ?

राजा, याप्रमाणें तुझ्याठायीं उत्तम गुण खचीत असावे, हा हेतु धरून तुला मीं हे सर्व प्रश्न केले. धर्मा, चित्त सावधान राखून विचारपूर्वक वर्तावें, ह्मणजे तेणेंकरून इहलोकीं कीर्तिलाभ होऊन देहांतीं उत्तमलोक प्राप्त होतो. याप्रमाणें नारदऋषींचें वाक्य ऐकून धर्मराजा परम आनंदयुक्त होऊन बोलला, महाराज, आपण महाभागवतोत्तम आहां, आपल्यापुढें या सेवकानें काय बोलावें.

याप्रमाणें ही नारदनीति सभापर्वांत सांगितली आहे. ज्याला राज्याची इच्छा असेल त्यानें ही नीति मनापासून वाचून ध्यानांत ठेवावी, ह्मणजे त्याच्या सर्व चिंता नष्ट होऊन त्याला चक्रवर्तित्व ह्मणजे र[illegible] भूमंडलाचें स्वामित्व प्राप्त होईल.





इति

विदुरनीति, यक्ष प्रश्न

व

नारदनीति समाप्त.

